॥ श्रीव्यंकटेश प्रसन्न ॥

# पेल्यांतील वादळ

लेखक

श्री. बाबुराव गोखले

प्रकाशक

मॉडर्न बुकडेपो

आनंदाश्रमासमोर, पुणें २

मूल्य १ रु. ] [ १९५२

या नाटकाचा प्रथम प्रयोग "**के. नारायण नाट्य-संघा**"ने पुणें येथे "प्रभात टॉकीज्"मध्ये १० ऑक्टोबर १९४२ रोजीं करून दाखविला. त्या प्रयोगांत भूमिका करणाऱ्या नटनटींचीं नांवें :-

[प्रवेशानुक्रमें]

| | |
|---|---|
| **शिरीन** | "जयमाला" |
| **शरद्** | श्री. रघुनाथ क्षीरसागर |
| **विठू** | श्री. रामभाऊ ग्रामोपाध्ये |
| **रखमा** | श्रीमती इंदिराबाई |
| **बाबासाहेब** | श्री. कृष्णराव गाडगीळ |
| **शाळिग्राम** | श्री. बाबुराव गोखले |
| **शालन** | सौ. नलिनीबाई डेरे |
| **सखारामबापू बोकील** | श्री. वसन्त ठेंगडी |

(नाटकांतील सर्व कथाभाग शरत्कुमार यांच्या बिऱ्हाडीं ओळीने तीन दिवसांच्या तीन सकाळीं घडला आहे.)



प्रकाशक: नारायण त्र्यंबक भिडे, बी. ए. मॉडर्न बुकडेपो, पुणें २.
मुद्रक: लक्ष्मण नारायण चापेकर, आर्यसंस्कृति मुद्रणालय
१९८/१७ सदाशिव पेठ, टिळक रस्ता, पुणें २.

माझी मावशी

# ती. उमाबाई जोशी

यांना अर्पण

## वादळापूर्वी—

मला कांही विशेष सांगावयाचें आहे असें नाहीं. प्रेक्षक नाटक पाहावयास आला असतां प्रसन्न मनाने त्याला घरीं पाठवावयाचा एवढेंच नाटककाराचें व त्या नाटकांत भूमिका करणाऱ्या नटांचें कर्तव्य असतें. तें कर्तव्य पार पाडण्याचा प्रयत्न मीं आणि के. नारायण नाट्यसंघाने कसोशीने केला.

"प्रत्यहीं घरोघरीं होणाऱ्या साध्या भांडणांचें आणि मतभेदांचें कांही कांही वेळीं कसें भयंकर पर्यवसान होण्याचा संभव असतो" हें मीं या नाटकांत दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. तो कितपत यशस्वी झाला आहे हें ठरविण्याचें काम सर्वस्वीं वाचकांचें व प्रेक्षकांचें आहे.

माझ्या मूळ "पेचप्रसंग" या दोन अंकी नाटिकेंतून प्रस्तुत "पैल्यांतील वादळ" हें नाटक विस्तार पावलें आहे. माझी मूळची नाटिका रंगभूमीवर अर्धापाऊण तास होत असे. तिचें हें आता तीन तासांचें स्वरूप पाहून तींत किती भर पडली आहे, हें समजून येण्यासारखें आहे.

माझ्या मूळ "पेचप्रसंगां"तील दोन अंकांतील मजकुराची जुळणी आणि संपादन करून व कांही नवीन मजकुराची भर घालून श्री. के. नारायण काळे यांनी पहिला अंक तयार केला; व दुसरा आणि तिसरा हे अंक माझ्या पेचप्रसंगांतील मूळच्या कल्पनेची बैठक कायम ठेवून, तिच्याशीं सुसंगत असे, त्यांनी स्वतंत्रपणें स्वतःच लिहिले. त्याबद्दल मी त्यांचा आभारी आहें.

या नाटकांतील सर्व भावगीतें माझीं स्वतःचीं असून त्यांवर श्री. के. नारायण काळे यांच्यासारख्या चोखंदळ टीकाकाराचा हात फिरला आहे.

त्यांना चाली देण्याचें व त्या बसवून घेण्याचें काम श्री. भाऊसाहेब पुराणिक यानी केलें आहे.

माझ्या ह्या पहिल्या नाट्यकृतीचें प्रकाशन श्री. भिडे यांनी कागद अतिशय महाग असतांहि धाडसाने केल्याबद्दल त्यांचे व माझ्या भूमिकांचें हुबेहूब यथार्थतेने आत्मसात् करून त्या प्रकटविण्यांत सर्वस्व ओतणाऱ्या के. नारायण नाट्यसंघाच्या नटनटींचे आभार मानून मी सर्वांची रजा घेतों.

विजयादशमी
४०३/२ सदाशिव पेठ,
'श्रम-विश्राम' बंगला, पुणें २

बाबुराव गोखले

# पेल्यांतील वादळ



## अंक पहिला

[स्थळ– दिवाणखाना. बिऱ्हाड नुकतेंच आलेलें असल्यामुळे अद्याप सामान तसेंच अस्ताव्यस्त चोहोंकडे पडलेलें दिसत आहे. शिरीन एका बाजूला हार्मोनियम् वाजावीत बसली आहे. शरद्कुमार आवराआवर करीत आहे.]

शरद – राणीसरकार, तो बेंडबाजा आता बंद करा आणि हें बुक-शेल्फ उचलायला लागा बरं आम्हांला.

शिरीन – उचला तुम्हीच. नाही तर गडी ठेवा एखादा. अंऽ जरा ती उशी द्या ना आणून !

शरद – मी ? मी आणून देऊं ती उशी ? घे तूंच.

शिरीन – आणि तुम्हीं आणून दिलीत तर काय झालं ?

शरद – होय तर ! आतां उशी मागितलीस, जरा वेळानं तूं स्वतःला उचलून ठेवायला सांगशील मला !

शिरीन – मग काय झालं सांगितलं म्हणून ? कालच मी माहेरून नाहीं आलें तों मला न विचारतां घर बदललंत आणि आज म्हणे मला आवराआवर करायला लाग. माझ्या जिवाकडे कांही बघा की !

शरद – बघूं ? बघतों. आणि मग हें काम कुणीं करायचं माझ्या जिवा ?

शिरीन – मग नाही ना देत तुम्ही उशी ?

शरद – नाहीं– नाहीं– नाहीं. घे तूंच. नाहीं तर मोलकरीण ठेव एखादी. अग, नवराबायको हीं संसाराच्या गाड्याचीं दोन चाकं आहेत. त्यांतलं एक जर बाजूला झालं तर– (तिच्या छत्रीला अडखळून पडतो.)

शिरीन – धडपडायला काय झालं ?

शरद – हें कुणीं ठेवलं इथं ? (छत्री आणून) हें पाहा तुला सांगून ठेवतों; ह्या घरांत असा अव्यवस्थितपणा मला मुळींच खपायचा नाही. प्रत्येक वस्तु आपापल्या जागीं पाहिजे. त्या घरांत अशी सोय नव्हती म्हणून मीं हें गांवाबाहेर एवढं मोठं घर घेतलं.

शिरीन – अहाहाहा ! काय पण घर ? चांगलं सोन्यासारखं तें गांवा-तलं घर सोडलंत आणि इथं गांवाबाहेर मला आणून टाक-लीत. कुणाकडं बसायला जाईन म्हटलं तर कुणाची ओळख-सुद्धा नाही.

शरद – अग, ओळख काय, होईल हळू हळू.

शिरीन – तिथं शेजारी सरलाबाई होत्या. पलीकडे एम्ब्रॉयडरी मार्ट-च्या त्या सुशीलाबाई होत्या. जवळच महिलासंघ होता. इथं काय आहे ?

शरद – काय नाही तें मला सांग. चांगली हवाशीर जागा आहे. त्या तिकडं वडाऱ्यांच्या झोंपड्या आहेत. तिकडे तें मुलींचं कॉलेज आहे. पलीकडून कालवा वाहतोच आहे. तो गौळवाडा– कित्ती कित्ती आहे. अग संध्याकाळीं नुसती गच्चीवर बसलीस

तर हां हां म्हणतां वेळ जाईल, संध्याकाळीं आपला तर गच्चीवर बसून छान वेळ जातो बुवा.

शिरीन – हं. फिरायला जाणाऱ्या येणाऱ्या बायकांचीं तोंडं पाहायला सांपडतात ना तुम्हांला. आम्हांला थोडंच तसं करतां येतंय्? आम्ही कोणाच्या तोंडाकडे पाहावं?

शरद – माझ्या. डार्लिंग माझ्या. अग, आपला प्रेमविवाह कांही उगीच नाही झाला. मला तूं आणि तुला मी. आपल्या जोडीपुढं राम-सीता, लयला-मज्नू, शिरीन-फरहाद, रोमिओ-जुलिएट ह्या जोड्या तुच्छ आहेत. चल, मला आवराआवर करायला मदत कर.

शिरीन – चला. 'झालंच आहे आपलं लग्न, आता मदत न करून कुणाला सांगू?

शरद – अरेच्या! पण मीं तुझ्याशीं लग्न केलं म्हणजे काय तुझ्या गळ्यांत कुणी धोंडा का बांधलाय? तुला वाटलं तर येऊं नकोस. आणि माझ्या अंगांत काय ताकद नाही अशी तुझी कल्पना आहे काय? मीं मनांत आणलं तर मारुतीनं जसा लक्ष्मणाकरता द्रोणागिरी उचलून आणला तसा तुझ्याकरता मी हें घरच्या घर पुन्हा गांवांत नेऊन ठेवीन.

शिरीन – नको नको हं. असा मारुति गुरु केलात तर माझं कसं होईल? चला. तें शेल्फ कुठं ठेवायचं तें सांगा.

शरद – अस्सं! आता कशी गृहिणी शोभून दिसतेस! चल.

(शेल्फ ठेवतात. इतक्यांत दूधवाला येतो)

दूधवाला – बाई, दूऽऽध.

शिरीन – आज उशीर कां रे?

दूधवाला – बाई, एक कलाक तुमचं घर धुंडाळतोंय बघा, लई आड. कुणीकडच्या कुणीकडच घर घेतलंयसा.

शिरीन – बघा बघा ! दूधवाला सुद्धा म्हणतोय घर किती लांब घेतलंय म्हणून.

शरद – काय रे ? आं ? हें घर लांब आहे होय ? तुम्हांला कष्ट करायला नको. नुसता पैसा पाहिजे.

शिरीन – पैशाबद्दल कुठं काय म्हणतोय तो ?

शरद – म्हणायला कशाला पाहिजे ? गांवापासून हाकेच्या अंतरावर आहे हें घर. आलास तर काय पाय मोडतात होय रे ? होत नसेल तर सायकल ठेव.

शिरीन – सायकलीला पैसा लागतो म्हटलं.

शरद – Exactly ! आला पैशाचा मुद्दा. लांब घर घेतलं म्हणून उशीर झाला. उशीर झाला तर पैसे वाढवा--पैसे वाढवा म्हणजे सायकल ठेवतों.

दूधवाला – बाई, भांडंऽऽ.

शरद –अरे हो. पाह्यलंस ! त्याला भांडं द्यायचं सोडून नुसती भांडत बसली आहेस. दे भांडं त्याला. (रागारागानं आंत जाते.) हें पाहा घर लांब असेल नाही तर जवळ असेल. मला जिथं पाहिजे तिथं मीं घेतलंय. तुला गिऱ्हाइक टिकवायचं असलं तर ये; नाहीं तर तुझं दूध आम्हांला नको.

शिरीन (प्रवेश करून) – कां नको ? ह्या गवळ्याचं दूध चांगलं असतं. शिवाय स्वस्तहि असतं.

दूधवाला – व्हय. पर ह्या महिन्यापासून जरा वाईच-भाव–

शरद – काय ? भाव वाढणार का ह्या महिन्यापासून ?

दूधवाला – व्हय साहेब ! धारण काय वाढलीय वैरनीची !

शरद – छान् (बायकोकडे पाहून) आणि म्हणे ह्या गवळ्याकडे दूध स्वस्त मिळतं.

शिरीन – अहो, लढाईमुळं झालं असेल तसं.

शरद – झालं. लढाईचं नांव सांगितलं कीं आमचं तोंड बंद. (गवळी जातो) हें बघ तुला सांगतों, ह्या घरांत अधिकार माझा आहे. मीं म्हटलं गवळी बदलायचा—

शिरीन – गेला तो. (ती हॅटस्टँडवर दुधाचें भांडें ठेवते. शरद तें उचलून बाजूला ठेवतो.)

शरद – अरे खरंच की! बरंय उद्या सांगतों त्याला. (पुन्हा आवरा-आवरीला सुरवात) हं, आतां टेबल. मला वाटतं, डार्लिंग, ह्या कोपऱ्यांत बरं दिसेल नाहीं टेबल?

शिरीन – त्या कोपऱ्यांत टेबल! आणि उजेड कुठून पडणार तिथं? त्यापेक्षा या खिडकीजवळच बरं दिसेल.

शरद – पण टेबलावर खिडकींतून बाहेरची धूळ येईल ती?

शिरीन – हें तुम्हांला कळतंय ना? मग हें घर पाहतांना नाहीं का लक्ष्यांत आलं तुमच्या?

शरद – (घरावर टोमणा आहे असें पाहून) बरं, तुझ्या म्हणण्याप्रमाणे तिथं टेबल ठेवतों. डार्लिंग, तुझ्या म्हणण्याबाहेर कधीं गेलों आहें का मी? (टेबल ठेवतो. इतक्यांत टाइम्सवाला पोऱ्या येतो.)

शिरीन – का रे? ही काय टाइम्स टाकायची वेळ होय?

शरद – झालं! एखाद वेळेला उशीर झाला म्हणून काय झालं? एवढं कांही लगेच त्याला बोलायला नको. लढाईमुळं....

पोऱ्या – नाहीं साहेब. घाटांत पाऊस झाला ना! म्हणून गाड्या वेळेवर आल्या नाहीत.

शिरीन – म्हणजे? हा पावसाळाच आहे. रोज पाऊस पडणारच. म्हणजे रोज तूं उशीर करणार कीं काय? त्यापेक्षा मी म्हणतें टाइम्स बंदच केला तर! एऽ हें बघ, उद्यांपासून आम्हांला टाइम्स नको.

शरद – टाइम्स नको? मोठी शहाणीच कीं नाही!

शिरीन – हो! अन् तुम्ही तरी अगदी सखारामबापू बोकीलांचेच अवतार कीं नाही!

शरद – मी सखाराम बापू बोकील असेन नाहीं तर नाना फडणीस असेन. टाइम्समधलीं दैनिक सुभाषितं वाचून तर मी माझ्या ज्ञानांत भर घालतों, आणि म्हणे टाइम्स नको. तूं जा रे. टाइम्सची वर्गणी कोण देतोय?

पोऱ्या – तुम्ही साहेब.

शरद – मग? उभा काय राह्यलास? चालता हो. आम्हांला टाइम्स बंद करायचा नाही.

शिरीन – नाही म्हणजे? आम्हांला टाइम्स नको.

शरद – थांब रे. (बायकोला) तुम्हाला टाइम्स नको? मग घरांत तुम्हांला रद्दी कुठून मिळणार?

शिरीन – कां? तुमच्या काव्याच्या न् नाटकाच्या वह्या असतात की!

शरद – वाऽ! त्यांनी फार तर चूल पेटवशील. पण दूधदुभत्याच्या कपाटांत घालायला मोठं वर्तमानपत्र कुठून आणणार?

शिरीन – (हंसून) हरलें मी. टाइम्स पाहिजे बाबा. (पोऱ्या जातो.)

शरद – Right: शिरीन किती प्रेमळ आहेस तूं! तूं कध्धी कध्धी माझ्या म्हणण्याच्या बाहेर जात नाहीस. वाऽ! I am the Luckiest husband in the world. बरं आता हीं चित्रं कुठं लावावींत बरं? डार्लिंग, तुझं काय मत आहे?

शिरीन – त्यांत मत काय असायचं ? चांगलीं चित्रं कुठंहि लावलीं तरी तीं चांगलींच दिसायचीं. खरं कौशल्य आहे स्वयंपाकघर लावण्यांत. पाहा तर खरं, मीं कसं स्वयंपाकघर सजवलं आहे तें ! (दोघें आंत जातात. आंत जातांना ती दुधाचें भांडें घेऊन जाते–)

शरद – (स्वयंपाक घरांतून) हें काय दुभत्याचं कपाट, आणि इथं ? मग आम्हीं जेवायला कुठं बसायचं ? (इतक्यांत एक गडी व एक मोलकरीण येतात.)

विठू – अगऽ पर तुला दुसरं घर न्हवतं का नोकरी बघायला ?

रखमा – अन् तुम्हांला दुसरं घर नऽहतं ? जतं जतं मी जातीया तत तत तुमी बी कसं हटकून ठेवलेल !

विठू – हे बघ, मुकाट्यानं जा हतनं. मी राहानार हाय हतं नोकरीला.

रखमा – कां व ? त्यांना वाटेल त्याला ठ्येवतील त्ये. माझ्यावानी मोलकरीन मिळाल्यावर त्ये तुमाला ठ्येवनार व्हय ? त्वांड बघा. (शरद व शिरीन येतात).

शरद – छट्, हें स्वयंपाकघर आहे का कोठीची खोली आहे ? (गडी व मोलकरीण यांना पाहून) काय रे ? कोण तुम्ही ? काय पाहिजे तुम्हांला ?

विठू – नोकरी मालक.

शिरीन – आणि तुला ग ?

रखमा – नोकरी बाईसाब.

विठू – इला काय व्हनार हत नोकरी ? येवढ्या घराचं काम निभनार हाय व्हय इला ?

रखमा – हां ! आन् बाईसाहेबांच काम तुला रासवटाला निभनार हाय जनू ? तुमाला मोलकरीणच हवी बाईसाब.

शरद -- काय रे ! भांडतां काय ? तुम्ही काय नवरा-बायको आहांत भांडायला ? खरंच शिरीन आपल्याला एका माणसाची जरूरी आहेच नाही का ?

शिरीन -- काय करायचा तो ?

शरद – तुझ्याकरता. डार्लिंग तुझ्याकरता. ज्या वेळीं तुझा माझा प्रेम-विवाह झाला त्या क्षणींच मीं प्रतिज्ञा केली की, "मी माझ्या शिरीनला आजन्म फुलासारखी ठेवीन. तिला कांहीएक त्रास पडूं देणार नाही."

शिरीन – खरंच ! किती चांगले आहांत तुम्ही !

शरद – मग ठरलं ?

शिरीन – ठरलं ! काय ठरलं ?

शरद – गडी ठेवायचा म्हणून.

शिरीन – कुणीं म्हटलं ? माझ्याकरता माणूस ठेवायचं ना ? मग गडी कशाला ? ही मोलकरीणच ठेऊं म्हणजे झालं.

विठू – पन माऽलक, तुमाला बी एक नोकर नग का ? ह्यें आन् त्यें आन् शंभर काम असत्यात तुमचीं. त्यें काय ह्या मोल-करणीला उराकनार हाय व्हय ?

रखमा – अन् बाईसाब, तुमचीं धुनींभांडीं ह्यो गडी करनार हाय व्हय ?

शिरीन – आम्हांला एक माणूस ठेवायचं आहे. मी मोलकरीणच ठेवणार.

शरद – मोलकरीण काय ठेवणार ? तुला काय कळतंय ? गडीच पाहिजे आपल्याला.

शिरीन – ठेवा तर.

शरद:– ठेवला.

शिरीन – मग मींहि ह्या मोलकरणीला ठेवली.

शरद — तूं ढीग ठेवशील. पण या लढाईच्या महागाईंत दोन नोकरांचा पगार परवडणार आहे कां आपल्याला?

शिरीन — तें मला कांही माहीत नाही. मला मोलकरीण पाहिजे, मीं ठेवली. तुम्हाला ऐपत नसेल, तर माझ्या मोलकरणीचा पगार मी देईन. नांव काय ग तुझं?

रखमा — रखमा.

शरद — आणि तुझं रे?

विठू — विठू.

शरद -- ठीक आहे. विठू, तूं जा आता. लाग कामाला.

शिरीन -- रखमा, ती बादली अन् खराटा घे आणि स्वयंपाकघराची फरशी धुवून काढ.

रखमा -- व्हय बाईसाब. बाईसाब, तुमच्यासारखी मायाळू मालकीण साऱ्या दुनियेंत सांपडायची नाही.

विठू -- अग व्हय. अन् आमच्या साहेबासारा लाख मानूस मिळणार हाय व्हय कुठं?

शिरीन — विठू, कोणाला बोलतो आहेस तूं? ती मोलकरीण माझी आहे. तिला बोलशील तर—

शरद — (तिच्या अंगावर चालून जाण्याचा अविर्भाव करीत) डार्लिंग, काय करशील ग? काय काय करशील? (विठू रखमास) जा रे, तुम्ही आपल्या कामाला. (जातात).

शिरीन — (रुसव्याने स्फुंदत) बोला. आणखी बोला. गडी माणसांसमोर माझा असा पाणउतारा करतां? करा!

शरद — (नरमाईने) डार्लिंग, भलतंच बोललों मी. क्षमा कर मला.

शिरीन — कांही नको. पहिल्यांदा हवं तें बोलायचं आणि मग मागाहून आपणच क्षमा मागायची. माहिती आहे मला.

शरद – बरं बरं. नाही, नाही; पण रागावूं नकोस म्हणजे झालं. चला. आता थोडीशी राहिलेली आवराआवर करूं या.

शिरीन – पण आता मला स्वयंपाकाला नको का लागायला ?

शरद – शिरीन, तुझ्या नवऱ्याबद्दल तुझी काय कल्पना आहे ?

शिरीन – कीं आहे आपला एक उनाडटप्पू म्हणून !

शरद – छे: ! छे: ! अगदीं चूक. अग, तो राजकारणांत पडला असता तर आज भारतमंत्री झाला असता. घर लावतां लावतां तुला स्वयंपाक करायला वेळ मिळणार नाही म्हणून खाणावळींत दोन डब्यांची ऑर्डरसुद्धा देऊन ठेवलीय.

शिरीन – माझे शरद ! माझे एकटीचेच.—

**संसारिं एक माझा तूं प्रीतिचा विसावा ।**
**मतभेद भांडणांना थारा तिथें नसावा ॥ध्रु०॥**
**ये खेळुं प्रीत खेळ तूं मी मिळून जीवा ।**
**होवोनि खेळ तूझा माझा न जीव जावा ॥१॥**
**प्राणाहुनी जपेन अनमोल प्रीत–ठेवा ।**
**चुकवून कोणि डोळा पळवून तो न न्यावा ॥२॥**
**प्रीति–फुलोर गेहीं आपुल्या सदा फुलावा ।**
**परि बोलबोलतां तो नाथा न चुरगळावा ॥३॥**

शरद – हो. समजलं ! ( एक तसबीर उचलून ती मध्यावर लावायला जातो. )

शिरीन – ( तसबीर पाहून ) हें काय ? हा फोटो इथं नाही टांगायचा.

शरद – नाहीं म्हणजे ? इथंच टांगायचा. वा: ! काय रोमॅन्टिक पोझ आहे ही ! दोघांच्या एकमेकांवरच्या अलोट प्रेमाची भावना

दर्शविणारे ते आपले डोळे--मीलनोत्सुक असलेलं तें आपलं दोघांचं ओष्ठद्वय—एकमेकांला बिलगलेले ते आपले गाल—(ती लाजून बाजूला होते) हां—हां—आता लाजून काय उपयोग !

शिरीन — पुरे झालं ! हं तुम्ही जर तो फोटो इथं टांगलात तर मी बागेंत जाऊन स्वतःला टांगून घेईन.

शरद — खुशाल जा. टांगून घेतल्यानंतर प्राण जातोच याचा हमखास अनुभव कधी घेतला आहेस का ? हा फोटो ह्मणजे आपल्या उत्कट प्रेमाचा दस्तऐवज आहे, समजलीस ? नकार सहस्रनाम जपणाऱ्या तुझ्या वडलांपासून मी तुला प्रेमाच्या जोरावर जिंकून आणलं त्याचा हा विजयध्वज मला इथं लावलाच पाहिजे.

शिरीन — ध्वज ह्मणे. आपल्या प्रेमाचं असं चारचौघांत प्रदर्शन व्हायला नको आहे मला.

शरद — तें तू कांही म्हण. मी हा फोटो इथंच टांगणार.

शिरीन — ठीक आहे. मग त्यांतला माझा फोटो कापून काढा.

शरद — भलेऽ ! या फोटोंतला तुझा फोटो कापून काढू ? माझ्या अर्धांगावर अत्याचार करूं ? नटीच्या फोटोशिवाय जशी कॅलेंडरला मजा येत नाही, मिशांचे दोन ठिपके न् पायघोळ पँटशिवाय जशी चार्ली चॅप्लीनच्या फोटोला गंमत नाही, तशीच बायकोशिवाय नवविवाहित तरुणाच्या फोटोला शोभा नाही.

शिरीन — पण मीं सांगितलं ना की माझी अशी शोभा व्हायला नको आहे म्हणून ? तुमचा एकट्याचाच फोटो लावायला माझी काही ना नाही.

शरद — अग पण माझा एकट्याचाच फोटो इथं लावायचा असता, तर लहानपणीं तोंडांत चोखणं धरून काढलेल्या फोटोपासून

तों परवां तोंडांत सिगरेट धरून काढलेल्या फोटोपर्यंत एकंदर एकशेंतेवीस फोटो माझ्याजवळ आहेत. त्यांतला नसता का एकदा लावला? पण डार्लिंग, तुझा-माझा हा एकत्र काढलेला फोटो म्हणजे—( जवळ जाऊं लागतो )

शिरीन – पुरे हं वशिला. वशिल्यांनी नोकऱ्या मिळतात. बायका नाही वश होत!

शरद – पण आता मला बायका वश व्हायला नकोच आहेत मुळीं. ही एक वश झाली तेवढी माझी मला पुरे आहे, हें दाखवायलाच मला हा फोटो इथं लावायचा आहे. ( ओढाताण सुरू होते.) तुझ्या नवऱ्याचं तुला ऐकलंच पाहिजे. संसाराच्या वाक्यांत नवरा हा कर्ता असतो.

शिरीन – कर्म तुमचं. ते दिवस गेले म्हटलं! नवराबायको हीं संसाराच्या गाड्यांचीं दोन चाकं आहेत ना?

शरद – खड्ड्यांत गेला तो गाडा. (पुन्हा ओढताण सुरू होते बाबासाहेब, शिरीनचे वडील, येतात.)

बाबासाहेब – अरे अरे अरे काय हें? गाडींत भांडण, स्टेशनवर भांडण, टांगेवाल्याशीं भांडण आणि घरीं पाहातों तों भांडणच. अं? ( दोघें नमस्कार करतात. ) अष्ट पुत्रा....

शरद – हां, हां, बाबासाहेब, तो आशीर्वाद जुना झाला. आता आशीर्वाद म्हणजे 'बलं उपास्व,' 'बर्थ कंट्रोलं जयस्व!' असा कांही तरी द्यायला पाहिजे.

बाबा – म्हणजे काय?

शरद – तें तुम्हांला नाही कळायचं.

शिरीन – आणि बाबा, काल मी येईपर्यंत तुमचं कांही इकडे यायचं ठरलं नव्हतं, मग आता एकदम—

बाबा – अग, माझ्या कारखान्याच्या यंत्रांतला एक महत्त्वाचा पार्ट काल एकदम मोडला. ह्या दिवसांत चार दिवस कारखाना बंद ठेवून भागतंय् ? म्हणून ताबडतोब आलों.

शिरीन – बाबा, तें झालं; पण तें भांडणाचं काय म्हणालांत ?

बाबा – हो. तें भांडणाचं तसंच राहिलं. गाडींतल्या भांडणाचं कारण दुसरं काय असायचं ? गर्दी. अग इतकी गर्दी मीं माझ्या हयातींत एकाहि प्रवासाच्या वेळेला पाहिली नव्हती. अग, गार्डाला न् इंजिन ड्रायव्हरलासुद्धां बसायला जागा नव्हती.

शिरीन – बाबा, अलिकडे तुम्ही भारीच विनोद करतां बाई.

बाबा – हें बघ, विनोद पाहिजे माणसाला. त्या आपल्या बाबूराव अत्र्यांनी ह्मटलंय ना, 'हसा आणि लठ्ठ व्हा.'– मी ह्मणतों, 'हंसा, हंसवा, लठ्ठ व्हा– पण भांडू नका.'

शरद – बरोबर आहे. भांडण नको बुवा.

बाबा – भांडण नको ? मऽग मला वाटतं आपलं मघाशीं भांडणच चाललं होतं जावई ! तुह्मी दोघं भांडायला बहिण-भावंडं आहांत का साहित्यिक आहांत ?

शरद – भांडण ? छे ! जरा आपलं– बाकी भांडणच नाही तर काय ? बाबासाहेब, मी तसा भांडखोरांतला नाहीं बरं का. तसं ह्मटलं तर भांडखोर आहे आपली मुलगी. (फोटो लपवून) मला एक कॅलेंडर लावायचं होतं. मीं म्हटलं, कॅलेंडर लोक नेहेमी दिवाणखान्यांत लावतात; आपणहि कॅलेंडर इथंच लावूं. तर तुमची ही लाडकी लेक म्हणते, की कॅलेंडर स्वयंपाकघरांतच लावूं.

बाबा – होय का ग पोरी ? अग पायातली वहाण पायांतच पाहिजे. बरं शरत्कुमार, कॅलेंडर तरी कसलं आहे ?

**शरद – कॅलेंडर – आपलं– नवीन वर्षाचं—**

बाबा — बघूं तरी कुठल्या नटीचा फोटो आहे वर ?

शरद — नटीचा ? छे: बाबासाहेब, नटींच्या फोटोवर कॅलेंडरचं सिलेक्शन करायला आपला जावई कांही छचोर नाही. (बायकोकडे पाहून ) I love nature. निसर्गाचा देखावा आहे एक.

बाबा — असं का ? अहो, निसर्गाचा शोकीन मीहि आहें. बघूं तरी चित्रकाराचं कसब ?

शरद — कसब ? तसं म्हटलं तर देखावा अगदीं गचाळ आहे (शिरीन फोटो हिसकावून घ्यायला पाहाते. तो लपवतो. इतक्यांत बाबासाहेब तो फोटो हिसकावून घेतात. )

बाबा — अरे वा ! काय सुंदर देखावा आहे हा. चित्रकारानं हा देखावा अगदीं बारकाईनं चितारलेला दिसतो. आहे बुवा ! आणि हें जुळं झाड कसलं ? गुलाबाचं दिसतंय. अरे, पण त्याला एकच गुलाब कसा आला ?

शिरीन — बाबा, तुम्ही सुद्धा थट्टा करतां माझी. माझ्या डोक्यांतलं गुलाबाचं फूल आहे तें.

बाबा — पोरी, किती सुंदर काढला आहे हा फोटो ! तूं छान दिसतेस, आमचे जावई रुबाबदार दिसताहेत. वा ! जावई, लावा तो फोटो मध्यावर. (शिरीनला) हें बघ, मनुष्यानं वारा येईल तशी पाठ फिरविली पाहिजे. झालंच आहे आता तुमचं लग्न. तेव्हा —

शरद — अस्सं ! बाबासाहेब, शिकवा तुमच्या पोरीला कांहीं तरी. रेजिस्ट्रार कचेरींतून आल्यापासून एकसारखं हें अस्सं चाललं आहे.

शिरीन — हें मात्र खरं हं ! तेव्हांपासून हे अगदीं धर्मराजाचे अवतार झाले आहेत. भांडण त्यांना ठाऊक नाही. मतभेद त्यांच्या

गांवीं नाहीत. बायकोवर इतकं प्रेम, की जगांतल्या एकाहि नवऱ्याचं आपल्या बायकोवर इतकं प्रेम नसेल.

बाबा – होय का हो? म्हणजे अगदीं बायलेच बनलेले दिसताय?

शरद – नाहीं, बाबासाहेब, तितकं कांही प्रेम नाही. पण—

बाबा – काय, प्रेम नाही? काय ग पोरी?

शरद – म्हणजे आता प्रेम आहे; पण जगांत चार नवऱ्यांचं जितपत आपल्या बायकांवर प्रेम असतं तितपत आहे. तसा मी कांही बायल्या नाहीं. प्रसंग पडला तर हिला (हातांतील फोटो उगारतो. बाबासाहेबांचें तिकडे लक्ष्य जातें, तें ध्यानांत येऊन–) म्हणजे बाबासाहेब, हा फोटो मध्यावरच लावूं ना? (लावतो) असं—

बाबा – हो. म्हणजे आल्यागेल्यांनी पाहिल्याबरोबर म्हटलं पाहिजे की हे बाबासाहेबांचे दिग्विजयी जावई!

शिरीन – बाबा, आईनं कांही असला हा फोटो इथं लावूं दिला नसता.

बाबा – भूल आहे तुझी. अग, तिला असं कांही नको आहे अशी का तुझी कल्पना आहे? अग आमच्यासारखं जोडपं साऱ्या दुनियेंत मिळणार नाही. आणि तुला खरं सांगूं? प्रेम करावं आमच्यासारख्या बुजुर्गांनीच. अरे, तुमच्यांत काय दम आहे? अलीकडचीं तुमचीं प्रेमं म्हणजे दैनिकं. रोज नवीन आवृत्ति.

शरद – खरं आहे तुमचं म्हणणं. पण एका बाबतींत आपला मत-भेद आहे. बुजुर्गांनीच प्रेम करावं आणि आम्हा अलीकडच्या लोकांना प्रेम करतां येत नाही, असं म्हणूं नका. एकंदरींत बायकांपेक्षां पुरुषच जास्त प्रेमळ असतात असं म्हणा तुम्ही. (आंतून विठू व रखमा भांडत येतात.)

रखमा – तुम्हांला माझं म्हननं पटत नसलं तर तुम्हींच ही नोकरी सोडून द्या.

शरद – तेव्हां सांगायचा मुद्दा हा, की बायकांपेक्षा पुरुषच जास्त प्रेमळ असतात. विठू, काय झालं रे ?

बाबा – गडी न् मोलकरीण वाटतं. छान. अगदी तुमच्यासारखंच प्रेमळ जोडपं दिसतंय तुम्हीं नोकरीला ठेवलेलं.

विठू – माज्याकड अशी मारक्या म्हशीवानी बघूं नकोस. सांग साहेबांना भाडनाचं कारन.

रखमा – त्यांचा माझा काय संबंध ? मी बाईसाहेबांना सांगणार.

बाबा – शरदकुमार, या दोघांत बायकोच जास्त प्रेमळ दिसत्ये.

शरद – जास्त भांडखोर म्हणा. बाबासाहेब, या बिचाऱ्या विठूला–

शिरीन – विठू बिचारा आणि या बापड्या रखमाचं कांहीच नाही ? पुन्हा सांगतें की ती माझी मोलकरीण आहे.

शरद – आणि विठू माझा गडी आहे.

बाबा – म्हणजे ही कांहीतरी जगावेगळीच भानगड दिसतेय तुमची !

शरद – होय बाबासाहेब. विठू मी माझ्याकरता ठेवलाय.

शिरीन – आणि रखमाला मीं माझ्याकरतां ठेवलीय.

शरद – असं का तें सांगतों मागाहून. पण आधी यांचं भांडण तोडूं दे मला. हं. काय कारण झालं रे ?

विठू – काय नाय. मीं म्हंगालों आता दोघं बी नोकरीला लागलों हाओंत, तवा लगीन करूं या. तर ती म्हणतीया—

बाबा – अरे ! म्हणजे तुमचं लग्न अजून झालंच नाही का ? मग त्याच्या आधीच भांडतांय होय ? बऽरंऽ ! काय म्हणत होती ती ?

विठू – ती म्हनतीया की पैसे सांठवूं या. उमाप पैसं सांठवूं या, अन् मग लगीन करूं या.

शरद – रखमा, तो म्हणतो आधी लगीन करूं, ह्यावरून त्याचं तुझ्यावर किती प्रेम आहे, हें नाही का सिद्ध होत ?

रखमा – हा ! प्रेम ढीग हाय ! पर त्यें काय जाळायचंय ? गांठीला पैसा नसला तर म्होरं लेकरांबाळांची काय सोय ?

शिरीन – अग, हें त्यांना काय सांगतेस ? संसारांत पोरंबाळं होतात, ह्याची त्यांना आठवण तरी आहे का विचार.

बाबा – हं ! तुम्हा लोकांचं एकंदर प्रकरण बरंच पुढं गेलेलं दिसतंय. ह्या बाबतींत मीं जास्त लक्ष घालून कांहीं करायचं ठरवलं, तर माझा कारखाना मला तिकडे बंदच ठेवायला पाहिजे. शिरीन, मला आंघोळ करायचीय. पाणी काढव बरं.

शिरीन – अग बाई ! तुम्हांला चहासुद्धा विचारायला विसरलेंच की !

बाबा – नशीब मी इथं आलोंय हें नाहीं विसरलीस !

शिरीन – चला बाबा. आधीं चहा करतें.

बाबा – चला. ( दोघे जातात. )

शरद – विठू माझ्यापुढं ये. रखमा, तूंहि अशी पुढं ये. मला तुम्हांला असं सांगायचंय, की शक्यतोंवर तुम्ही तुमचीं भांडणं आमच्यापर्यंत आणत जाऊं नका. आम्हांला नसतो वेळ—आणि अगदींच नाहीं राहावलं तर न्हाणीघरांत जाऊन भांडत जा. तशांतून आज माझे सासरे पाहुणे आले आहेत, त्यांच्या देखत ज़रा अदबीनं वागा.

रखमा – थांबा. मी बाईसाहेबांना इचारतें कसं वागायचं तें.

विठू – अग जा ! साहेबांच्या म्होरं बाईसाहेबांचा तोरा दाखवतीय !

रखमा – तुम्ही गप्प बसा. ( जाते. )

विठू – साहेब, तुम्हांला एक इचारूं का ?

शरद – काय ? विचार.

विठू – आम्हांला दोघांना उगीच कामाला ठ्येवलं असं नाहीं ना तुम्हांला वाटणार ? नाहीं; आमचं जरा पटत नाही म्हणून पुसतों—

शरद – छट ! अरे बाबा, नवरा बायकोंत भांडणं हीं पाहिजेतच! भांडणा शिवाय संसार म्हणजे पेट्रोलशिवाय मोटर आहे बाबा.

विठू – तें खरं, पन–साहेब एकाद वेळेला लईच कावते, तवां वाटंत द्यावा हिचा नाद सोडून.

शरद – नाद सोडून द्यावा ? आणि मग ?

विठू – मग काय ? बगावी दुसरी कोणी येडीवाकडी–पन गरीबशी.

शरद – अरे, पण तुमचं इतकं प्रेम आहे, तर मग एवढ्याशा भांडणाला काय भ्यायचं ?

विठू – भांडणाचं कांय नाय मालक. पण तिचं माझं पटत नाही तर तिची बी कशाला कुचंबना माझ्यापायीं ? बरं तिला वाटलं तर तिनंबी दुसरीकडे बघावं.

शरद – हं !

विठू -- आता आम्हीं बोलूं नये हें खरं. पर—

शरद – काय ? बोल ना—

विठू – तुम्हांला दोघांना असं भांडतांना बघितलं की वाटतं तुम्हांला बी सांगावं दुसरी बायको करा म्हनून.

शरद – मूर्ख आहेस. अशी बायको सात जन्मांत मिळणार नाहीं मला.

विठू – असं म्हणतायसा ? मग रखमाला बी असंच वाटत असलं माझ्याबद्दल. थांबा, इचारून बघतों. (तो झटकन् पळत जातो.

शिरीन – ( प्रवेश करून ) हें काय ? कुठं गेला हा पळत ? अन् अजून डबे आणायला नाही का सांगायचे ? बाबांची आंघोळसुद्धा झाली. लवकर आंघोळ करा बरं तुम्ही. बाबांना जेवायला उशीर झालेला खपत नाहीं. उठा लवकर.

शरद – उठत नाहीं. माझं इथलं काम झाल्याशिवाय मी एक पाऊलहि हालणार नाहीं. बाबांना जेवायला उशीर होईल म्हणून तुझा जीव खालीवर होतोय. आणि आम्ही इथं कामाच्या रगाड्यानं मेलों तरी तुला काय वाटायचंय ? सुटलों, म्हणणार तुम्ही. ( शिरीन डोळयांला पदर लावते. ) हें काय डोळ्यांला पाणी—शिरीन, चुकलों; माफ कर मला. तुला रडवण्याकरता का मीं लग्न केलंय ?

शिरीन – बोलूं नका माझ्याशीं ! अशीं अभद्र बोलणीं बोलतां आणि—

शरद – अग पण —

शिरीन – बोलूं नका.

शरद – नाहीं बोलत. ( वर्तमानपत्र वाचीत बसतो. ) तुफान युद्ध. युद्धांत विषारी वायूचा उपयोग. ( ती हुंदका देते. ) अहा र रडू बाई. प्रसंग किती क्षुल्लक आणि तेवढ्यावरून रडतीय. म्हणजे तिकडे बायका युद्धावर जाण्यापर्यंत मजल गेलीय; आणि इकडे हें असं.

शिरीन – मग काय करूं ? आमचं कुणीसुद्धां ऐकत नाही.

शरद – वा ! पण मी ऐकतों आहे ना ?

शिरीन – हं ! काय ऐकताय ? नुसतं आंघोळीला उठा म्हटलं तर नाही नाहीं तें बोललात—

शरद – पण काय बोललों तें तरी सांग ? कांही चुकून बोललों असलों तर माफ कर मला.

शिरीन—आहे ठाऊक. आधीं आपणच आग लावायची, अन् मग आपणच विझवायला जायचं ?

शरद—चांगलं ! आपण लग्न केलं तें काय आगी लावायला ? खरं सांगूं, एकमेकांच्या प्रीतिरूपी जलसिंचनानंच संसाराच्या फुलबागा फुलत असतात.

शिरीन—पुरे बरं का हीं तुमचीं काव्यमय बोलणीं. तुम्ही एकदां काव्य बोलायला लागलांत कीं कुणीसुद्धा तुमचं तोंड बंद करूं शकत नाही.

शरद—तूं सुद्धा ? अं ! वेडे, संसार हेंच मुळीं एक काव्य आहे. लग्नापूर्वींचं एकमेकावरचं प्रेम म्हणजे एक सुंदर भावगीत असतं. लग्न झाल्यावर पहिल्या दोन तीन वर्षांत त्या भावगीताचं मुक्तछंदांत रूपांतर होतं. आता पुढं दोनतीन मुलं झाल्यावर त्या मुक्तछंदाचा तराणा होतो, ही गोष्ट निराळी. एकंदरींत संसार म्हणजे कसंहि असलं तरी एक काव्य आहे.

शिरीन—पुरे झालं हं आता तुमचं काव्य.

शरद—पुरे झालं ? राह्यलं. आता तुझ्या डोळ्यांतून गंगायमुनाच काय पण सिंधूनद जरी वाहायला लागला, तरी मी सह्याद्रीसारखा स्वस्थ बसून राहीन ! ( बसतो.)

शिरीन—(थोड्या वेळानें) जिवाला कांही वाटतंय का ? अहो, उठा ना !

शरद—उठा ! कशाला उठा ?

शिरीन—आंघोळीला ! बाबा तिकडे खोळंबून बसतील. मी तुमची ना ?

शरद—( ताडकन् उठून कृत्रिम रागाच्या आविर्भावानें) कशाला झालीस माझी ? कशाला तुझ्या बाबांनी तुझ्यासारखें लोढणं माझ्यासारख्या रसिक मनुष्याच्या गळ्यांत बांधलं ?

शिरीन – अहो, आपलं लव्ह-मॅरेज झालं आहे ना ?

शरद – लव्ह ! लव्ह ! लव्ह कशाशीं खातात तें तरी कळतं का तुला ?

शिरीन – मग केलंत कशाला माझ्याशीं लग्न ?

शरद – तुला कुणी पत्करत नव्हतं, तूं माझा अगदी पिच्छाच पुरविला होतास, आली मला दया, अन् केलं लग्न.

शिरीन – तर तर ! खेटर अडलं होतं माझं तुमचा पिच्छा पुरवायला. तुम्हीच सारखे माझ्या मागं मागं फिरत होतांत. माझ्या प्रेमावर खंडकाव्यसुद्धा लिहायची तयारी होती तुमची. "लाडके, प्यारी, तुझ्यावांचून मला एक क्षणभरहि करमत नाही; तूं सुंदर आहेस; तूंच मला हवीस; तुझ्याकरता मी काय वाटेल तें करीन" ह्मणून कां माझ्यावर सारखा प्रेमपत्रांचा पाऊस पाडत होतांत हो !

शरद – मी ? आणि पत्रांचा पाऊस तुझ्यावर पाडीत होतों ? काय स्वप्नं पडत होतीं कीं काय तुला ? माझ्या कॉलेजमधल्या एकंदर दहा बारा सुंदर मुली एकसारख्या 'माझ्याशीं लग्न करा.' 'माझ्याशीं लग्न करा' ह्मणून माझ्या दहा वर्षांच्या कॉलेज करीअरमध्यें व्यत्यय आणीत होत्या, त्यांपैकीं एकीलाहि मीं कधी उत्तर ह्मणून एक बोटभर चिठ्ठीसुद्धा पाठवली नाही; आणि तुझ्या वर ह्मणे मी पत्रांचा पाऊस पाडीत होतों !

शिरीन – बाई बाई बाई ! काय खोटेपणा तरी ! बाबांच्या हातीं पडूं नयेत, म्हणून तेव्हाच्या तेव्हा तीं पत्रं मीं जाळून टाकलीं म्हणून, नाही तर आता सारे गठ्ठे तुमच्या डोक्यावर आणून आदळले असते.

शरद – हं. पदरांत खोटेपणा आला. पुरावा जवळ नाहीं ; तेव्हां तूं म्हणायचीच तसं.

शिरीन – अस्सं ! मग मी एकदां चेष्टेंत ‘ तुमच्याशीं लग्न करणार नाहीं ’ म्हणून म्हटलं तर कां डेक्कन क्वीनखाली जीव द्यायला निघालां होतांत हो ?

शरद – भले! कुणीं सांगितलं तुला मी डेक्कन क्वीनखाली जीव द्यायला निघालों होतों ह्मणून ? मी चांगला झोन तिकीट काढून आग्र्याचा ताजमहाल पाहायला निघालों होतों.

शिरीन – हो का ? पण डेक्कन क्वीनला झोन तिकीट नसतं ह्मटलं !

शरद – नसेल ! आणि तो प्रश्न पुढचा होता. मला सांगायचं इतकंच, की एका असमंजस पोरीनं लग्नाला नकार दिल्याबरोबर आत्महत्या करायला जाण्याइतका मी मूर्ख नव्हतों. म्हणजे त्याचं असं होतं: इतर मुलींना असतात लव्हर्स, आणि आपल्याला नाहीत, यासाठी उगीच तूं हळहळत बसशील म्हणून तुझी दया येऊन प्रेमाचं थोडं नाटक केलं इतकंच !

शिरीन – हं ? जसं कांही तुमच्याशिवाय माझ्यावर प्रेम करायला दुसरं कोणी नव्हतंच ! आज वकील, डाक्टर्स, सबजज्ज असलेले कितीतरी त्या वेळचे कॉलेज स्टूडंटस् माझ्याकरता माझ्या शाळेभोवती घिरट्या घालीत असत. माझ्या मनांत नव्हतं म्हणून, नाही तर त्यांच्यापैकी कुणाशींहि मीं लग्न केलं असतं.

शरद – मग करायचं होतंस !

शिरीन – केलं असतं. पण तुमची कीव आली ना ! म्हटलं आधींच दहाबारा वर्षं कॉलेजमध्ये काढावीं लागलीं असल्यामुळं जीव बेजार झाला आहे यांचा; आणखी प्रेमांत निराशा होऊन जीव नको द्यायला यांनी माझ्याकरता.

शरद – म्हणजे तूं माझ्यावर उपकारच केलेस म्हणायचे!

शिरीन – हो. अर्थातच.

शरद – अस्सं काय? तेव्हाचं काय सांगतेस? आजचं बोल. मी लग्नाला उभा राह्यलों तर सुशिक्षित आणि सुंदर पोरींच्या झुंडींच्या झुंडी मला सांगून येतील.

शिरीन – होय तर! एखादी सुंदर सुशिक्षित मुलगी तर राहूंद्याच, पण आपली रखमा मोलकरीणसुद्धा तयार व्हायची नाही तुमच्याशीं लग्न करायला.

शरद – लग्नाला झालेल्या शंभर पोरींचे बाप दाराशीं धरणं धरून बसतील.

शिरीन – कोणीसुद्धां येणार नाही तुमचं तोंड बघायला.

शरद – माझ्याकडे कुण्णी येणार नाही? आणि तूं दमयंतीसारखं आपलं स्वयंवर मांडलंस, तर अगदी देशोदेशींचे राजेरजवाडे तुझ्यासाठीं धावूनच येणार असतील!

शिरीन – येतीलच मुळीं; पण तुम्ही माझे मॅनेजिंग डायरेक्टर आहांत ना! तुम्ही थोडंच मला माझं स्वयंवर मांडूं देणार आहांत?

शरद – मी तुझ्याआड मुळींच येणार नाहीं. म्हटलं तर मीच तुझ्या-आधीं माझं स्वयंवर मांडायला पाहिजे होतं. पण तूं आहेस ना!

शिरीन – पुरुषांच्या मार्गांतील धोंड होणारी स्त्री मी नव्हे. खुश्शाऽल मांडा स्वयंवर.

शरद – ठीक आहे. पण पाहा बरं.

शिरीन – पाहातें— पाहातें— पाहातें.

शरद – अच्छा, पाहाच विषाची परीक्षा. (राइटिंग पॅड घेऊन बसतो.) 'वधू पाहिजे'.

शिरीन – हें काय ? तुम्ही खरंच नोटीस देणार कीं काय 'वधू पाहिजे' म्हणून.

शरद – अलबत्. तुला वाटलं तर तूं दे नोटीस. म्हणजे व्यक्ति-स्वातंत्र्याचे दिवस आहेत हे. त्यांतून तूं नको म्हणत असलीस तर राह्यलं !

शिरीन – हं: ! मला माहीतच होतं तुम्ही अखेर अशी नांगी टाकणार म्हणून.

शरद – अस्सं काय ? बरंय तर ! "वधू पाहिजे"—

शिरीन – (गुणगुणते)

**...वधू पाहिजे ।...या वरा वधू पाहिजे ॥**

शरद – शू: ! सुंदर—

शिरीन – असं ?— बरं !—

**सुरेख वधु पाहिजे । अम्हांला सुरेख वधु पाहिजे ॥**

शरद – बरं ! काय ग, कोणत्या जातींत मुली जास्त सुंदर असतात ?

शिरीन – आता मला कां हो विचारतां सखाराम बापू बोकील ?

शरद – ठीक आहे. तुझ्याशिवाय मिळालेली वधू कशीहि असली तरी चालेल.

शिरीन –

**नावडती पहिली घरीं ।**
**जरि जिवंत आहे तरी ॥**
**लग्नास पुन्हा जो धजे । तयाला सुरेख वधु पाहिजे ॥**

शरद—शू: ! बोलूं नकोस मधें ! अग, जरा आपल्याच नवऱ्याचं लग्न होतंय, होऊं दे की. उगीच मधें मधें बोलून विघ्न कशाला आणतेस ? हं !— 'वराचा धंदा.

शिरीन— बायकांना फसवायचा.

**पत्नीस घरीं फसविणें ।**
**बाहेर सदा भटकणें ॥**

शरद— Shut up, I say. (लिहितो) वराचें मासिक उत्पन्न—

शिरीन — **मिळकतिचें नांवच नको ।**
**देतसे कर्ज बायको ॥**
**थाटांत अशा वर सजे । तयाला सुरेख वधु पाहिजे ॥**

शरद — उत्पन्न ! सुमारें सवाशे ! अऽहं. सवाशें हा आंकडा कांही भरदार दिसत नाही ! हं. पंधराशे—सालीना उत्पन्न पंधराशे ! (लिहितो व कागदाची घडी करतो.) काय वाटलं तुला ?

शिरीन — काय वाटलं ?

**कीं प्रतापरावास या । छानसा धडा द्यावया ॥**
**त्राटिका वधू पाहिजे ॥**

शरद — हें काय ? तूं काय तिकडे करतेस ?

शिरीन— आता का ? "तुझ्या आड मी मुळींच येणार नाहीं." असं कबूल केलं होतंत ना तुम्ही ? आतां मला वाटेल तें करीन मी ! व्यक्तिस्वातंत्र्याचे दिवस आहेत ना हे ?

शरद— डार्लिंग, वेडेपणा करूं नकोस हं. हें बघ, फाडून टाकतों मी माझी नोटीस. आणि तूंहि फाडून टाक तें पत्र.

शिरीन— तें माझं मी पाहीन. अहो चांगलं आपल्याच बायकोचं लग्न होतंय तर होऊं द्या कीं.

शरद— आता तूंच ऐकत नाहींस हं, डार्लिंग ! ठिक आहे. आपल्या घरांत हा फार्स करायचाच आहे, तर होऊन जाऊं दे. विठूऽ (विठू येतो) ही नोटीस.

विठू— साहेब, मला कामावरून काढताय ? अन् आजच्या आजच ?

शरद – तुला ऽ? अन् मीं काढणार? शक्य नाही--उलट तुला मीं माझा गुरु केला आहे. मघाशीच म्हणालास ना कीं.... बरं पण तें जाऊं दे. हें पाकीट नेऊन टाक पोस्टाच्या पेटींत.

शिरीन– रखमा. (रखमा येते.) हें पत्र नेऊन टाक पोस्टाच्या पेटींत.

(रखमा व विठू एकमेकांकडे बघून जातात. शरद व शिरीन दोन टोंकाला बसतात. इतक्यांत बाबासाहेब येतात.)

बाबा– अरे काय चालवलं आहे तुम्हीं? लागला ना तुमचा फोटो? मग आणखी काय आता?

शिरीन– कुठं काय?

शरद – नाही. तिला एक पत्र लिहायचं होतं. बसली होती ती तिथं लिहीत. अन् मीही थोडा थकलों होतों काम करून, म्हणून जरा पडलों होतों.

बाबा – एवढंच ना? मग कांही हरकत नाही. मला वाटलं तुमचं आणखी कांही भांडण बिंडण झालं कीं काय?

शिरीन – भांडण, छे छेः! भांडण कुठलं? आमचं कधींच भांडण होत नाही.

शरद – हो! उगीच केंव्हा केंव्हा आपले किरकोळ मतभेद! नाही का ग?

शिरीन – होय ना. ह्यांना जिथं जिथं आपलंच म्हणणं खरं करायला पाहिजे.

शरद – आता खरं असलं म्हणजे मग तें खरं नको का करायला?

बाबा – हां हां हां! जावईबापू, झाली पुन्हा सुरवात. अहो सर्वच खरं खरं करून चालत नाही. असं आहे तें. वेळेनुसार दुसऱ्याचं म्हणणं खोटं असलं तरी घटकाभर तें खरं म्हणावं लागतं! पण भांडणं नकोत. परवाचं तें ऐकलंत ना.

शिरीन – काय– काय बाबा ?

बाबा – अग तें ऽ ऽ ! आपल्या गणपतराव आणि त्यांच्या बायकोचं प्रकरण—

शरद – कसलं प्रकरण ?

बाबा – अहो, कोर्टापर्यंत खटलं गेलं; आणि तुम्हांला माहीत नाही अजून ?

शरद – अहो, म्हणजे आम्ही तर त्यांचा संसार म्हणजे लव्ह— मॅरेजचं एक नमुनेदार उदाहरण समजत होतों.

बाबा – अहो, तें खरं. पण मतभेद आहेत ना ! दोघांनाहि आपापलं खरं करण्याची हौस पडली. मग खरं कुणाचं आणि खोटं कुणाचं, ठरायचं कसं ? चाललं वाढत. शेवटीं आली पाळी इथपर्यंत. अहो, काव्याचा नायटा व्हायला काय वेळ लागतो आहे का ?

शिरीन – पण बाबा, झालं तरी काय ?

बाबा – काय व्हायचं राहलंय ? भांडणं झालीं. हाणामाऱ्या केल्या. घटस्फोटाची फिर्याद केली. आणि दोघांनाहि पश्चात्ताप होऊन तडजोड केली. सर्व कांही ठीक झालं. पण आता लोक छी: थू: करतील, तेव्हा त्यांना तोंड कसं दाखवायचं, म्हणून शेवटीं गांव सोडून निघून जावं लागलं त्यांना. क्षुल्लक मतभेदाचे परिणाम हे. तेव्हा सांगायचं काय ? 'तडजोड पाहिजे'. भांडणं नकोत. तुझं खरं– माझं खरं, दोघाचंहि खरं. चला उठा बघूं ! आणि तुमचा तो गडी अन् मोलकरीण कुठं गेलीं ? का भांडतां भांडतां गेलीं एकमेकांचा हात धरून पळून. हं चला. मी होतों पुढं. तुमचं लक्षण

कांही ठीक दिसत नाही. मीच पुढं होऊन पाटपाणी पाहतों. (बाबासाहेब आंत जातात.)

शिरीन – ऐकलंत ना ?

शरद –हो ऐकलं ! आणि मी तरी दुसरं काय म्हणत होतों ?

शिरीन – मग आता ?

शरद – आता आपली लाज त्या विठोबा-रखमाईचे हातांत. नेहमीप्रमाणं त्या दोघांचा मतभेद होऊन जर तीं पत्र न टाकतां तीं परत येतील तर काय मजा येईल ! (विठू व रखमा हसत हसत येतात.)

विठू – मजा आला साहेब ! लई मजा आला ! ही मला सांगायाला लागली, की तुम्ही त्यें पत्र टाकूं नका म्हनून. मी म्हनालों की तूं त्यें पत्र टाकूं नकोस म्हनून. लई झगडा झाला. पर शेवटीं झाली गोडी– ठरलं.

शरद }
शिरीन } – काय? काय ठरलं?

विठू – ठरलं की दोगांनी दोनी बी पत्रं टाकायचीं म्हनून; टाकलीं ! लई मजा आला बघा. (शरद व शिरीन दोघेंहि कपाळावर हात मारून दोन टोकाला बसतात. आपल्या आनंदावर विरजण पडलें म्हणून चेहेरा टाकून विठू रखमा एकमेकांकडे पाहतात.)

बाबा – (दरवाजांत प्रवेशून) अरे उठतां ना जेवायला ?

(पडदा पडतो.)

**अंक पहिला समाप्त**

# अंक दुसरा

[ स्थळ – पहिल्या अंकांतील. वेळ– दुसऱ्या दिवसाची सकाळ. रखमा मोलकरीण दिवाणखान्याची व्यवस्था लावीत आहे. शरद व शिरीन यांचा एकत्र काढलेला फोटो ती टांगल्या जागेवरून काढून ठेवते, तोंच विठू येतो. तिच्याकडे पाहातो. खांकरतो.]

विठू – काय ? काय करतीयास ?

रखमा – कुटं काय ? तसबीर पुसतीया न्हव का ?

विठू – हा: ! पुसनारनीचं त्वांड बघा. तसबीर पुसाया जागेवरनं काढावी लागती व्हय ? लाव तत परत.

रखमा – न्हाई लावनार जा. हुकूम करतुया. मी काय तुजी बाईल हाय व्हय ?

विठू – रखमा, मुकाट्यानं फोटो लाव जागच्या जागीं. न्हाई तर साहेबांस्नी सांगन बघ.

रखमा – अर, जा सांग. बाईसायबांनीच मला सांगितलया तसबीर काढाया.

विठू – थांब. तूं तशी न्हाहीस ऐकायचीस. (बेल वाजते.)

रखमा – अर ऐकूं येतया कीं न्हाई ? दरवाजा उगड.

विठू – तो फोटो दे हकड, आन् तूंच उगड जा.

दूधवाला – बाई दूऽऽध. ( दरवाजा उघडतात.)

रखमा – कां र, असा आग लागल्यावानी आरडतुयास कां ?

विठू – आन् आगीच्या बंबावानी सारखा घंटा बी बडवतुयास !

दूधवाला — मंग काय करूं ? मी हकड वराड वराड वराडतुया. कोनी ओ बी देईना, म्हटलं आज बी मालकांनी घर बदललंया जनूं.

रखमा — अर ऽ ऽ पण बाईसाब झोपल्याती अजून. कोन ओ घेनार तुला ? ( भांडें आणायला जाते. विठू फोटो लपवतो.)

विठू — अर काय र ? काय मानसाला झोपबीप हाय कीं नाय ? इतक्या लवकर रामपाऱ्यांत कशाला आलास कोकलाया ?

दूधवाला — अर वा र तिस्मारखां ! काल उशीरां आलों तर मालकीन-बाई वराडल्या, आन आज लवकर आलों तर तूं म्हनतुयास रामपाऱ्यांत कां आलास ? मानसानं धंदा तरी कसा करावा ? ( रखमा येते. दूध घेते. दूध आंत घेऊन जाते. विठू पुन्हा नीट फोटो लपवायला जागा पहातो, तों शाळिग्राम येतात.)

शाळिग्राम — कां रे, मालक आहेत का घरांत ?

विठू — आं ? अन् तुम्ही कोन ? अन् आमंदी कसे आलांत ?

शाळिग्राम — अरे, कसे म्हणजे काय ? दरवाजांतून ! उघडा दिसला, शिरलों आंत.

विठू — आर वा ! घर हाय कीं सराई हाय र ? काय घंटा बिंटा वाजवायची समजतीय का नाय ? व्हा बाहेर आदीं. घंटा वाजवा आन् मग आमंदीं या.

शाळिग्राम — अरे — अरे — अरे ! यापेक्षा कुत्रं पुरवलं.

विठू — कुत्रं ! व्हा भाईर.

बाबा — ( प्रवेशून ) अरे — अरे — अरे विठू, आहे काय आरडा-ओरड ? काय पाहिजे आपल्याला ?

शाळिग्राम — अहो, पाहिजे आहे पुष्कळ ? पण प्रथम या तुमच्या नोकराला आवरा.

बाबा – बरं बरं हं ! विठू आंत जा बरं तूं आपल्या कामाला ! हं. आतां बोला. काय रे, तूं कां अजून उभा ?

विठू – (घुटमळत) अंऽ बाईच जरा.

बाबा – काय रे ?

विठू – तुमच्या वळखीचे हायती व्हय ?

बाबा – नाही. कां ?

विठू – मला वाटलंच. येकदम आमंदीं घुसले की, आन् घंटा बी वाजवली न्हाई. जरा जपून हं !

बाबा – बरं बरं ! मी घेईन पाहून.

विठू – न्हाई. मी राहातुयाच आसपास. पन सांगून ठेवतों. (शाळिग्राम विडी पेटवतो. व सहजपणें काड्यांची पेटी खिशांत घालतो.)

बाबा – हीं गडी माणसं म्हणजे — हं काय? इतक्या सकाळींच—

शाळिग्राम – आपली जाहिरात वाचून आलों. शरद्कुमार आपणच ना? (उठून चालायला लागतो.) हं ! आम्ही जिथं जातों तिथं हें अस्सं होतं.

बाबा – मी आणि शरद्कुमार ? आमचं वय आहे का असलीं नांवं असायला ? अहो, आम्ही शरद्कुमारांचे पाहुणे.

शाळिग्राम – (पुन्हा बसतो.) मग कांहीं, हरकत नाही. बऽरं पण मग ते कुठं आहेत ?

बाबा – अहो, ते झोपलेत अजून. हंऽ. म्हणजे आमच्या शरद्कुमारांनी जाहिरात दिली आहे वाटतं. गडी झाला, मोलकरीण झाली. आतां खाणावळींचे डबे आणायला नकोत म्हणून स्वयं-पाकाला कुणीतरी ठेवायच्या खटपटींत दिसतेय स्वारी.

शाळिग्राम — हो स्वयंपाक आहे, गडीमाणसांच्यावर देखरेख आहे, संसार आहे—

बाबा — मग म्हणणं काय आहे तुमचं ?

शाळिग्राम — नाही. मी थांबतों ना. ते येतील आणि मग—

बाबा — पण माझ्याशीं बोलणं करायला कांही हरकत नाही.

शाळिग्राम — हो. आता पुढचं देण्याघेण्यासंबंधीचं बोलणं करायला कांही हरकत नाही. पण त्याच्याआधी एकमेकांची पसंती—

बाबा — अहो, पसंतीचं काय घेऊन बसलांत ? तें काय लग्न का आहे ?

शाळिग्राम — हो म्हणजे म्हटलं तर आहे; म्हटलं तर नाही.

बाबा — त्याची तुम्हांला नको काळजी. तसे आमचे शरद्कुमार मनमिळावू आणि मोकळ्या स्वभावाचे आहेत. माणसाची कष्ट करायची तयारी असली म्हणजे त्यांच्याशीं कोणाचंहि पटतं.

शाळिग्राम — अहो, असलं घर मिळाल्यानंतर मग कष्टाचं काय ? पण त्यांच्या आवडीनिवडी—

बाबा — नाही. तशा त्यांना खोडी वगैरे कांही नाहीत. दोन वेळां व्यवस्थित सुग्रास जेवण करून घातलं कीं बस.

शाळिग्राम — त्याची अगदी काळजी नको. त्यांत अगदी हातखंडा—

(पडद्यांतून आवाज) — तात्या, अहो तात्या.

शाळिग्राम — ओऽ

(आंतून आवाज) -- तात्या, कांही आहे का नाही तुम्हांला.

शाळिग्राम — आलों आलों.

बाबा — कोण ?

शाळिग्राम — आमची मुलगी. म्हणजे तिलाच घेऊन आलों होतों. तिला म्हटलं तूं खाली उभी रहा, मी वर जाऊन पाहून येतों.

मंडळी उठली आहेत किंवा नाही तें; पण बोलण्याच्या नादांत विसरूनच गेलों अगदी.

बाबा — अंऽ! इथली काड्यांची पेटी काय झाली ?विठू, ए विठू! (विठू येतो.) इथली काड्यांची पेटी काय झाली रे ?

विठू — म्हंजी ? ह्ये आले तवा हतच व्हती की. (तो शाळिग्रामकडे पाहतो.)

शाळिग्राम — म्हणजे आम्हीं आमच्या खिशांत टाकली कीं काय ? (पेटी काढून ठेवतो.) पाहिलंत ? आमचं हें अस्सं होतं.

(आंतून आवाज) — तात्या, येतां ना ?

शाळिग्राम — आलोंऽ (जातो. मध्यंतरीं विठू बाबासाहेबांची विडी पेटवतो.)

विठू — बगा बाबासाब. तरी मी सांगत होतों. (तो स्वतः पेटी खिशांत घालतो.)

बाबा — चल्. खुळा कुठचा. अरे विडी ओढणाऱ्यांना सवयच असते ही. (त्याच्या खिशांतील पेटी काढून आपल्या खिशांत ठेवतात. विठू खाकरून ही गोष्ट त्यांच्या ध्यानांत आणून देतो. बाबासाहेब आपल्या वेगवेगळया खिशांतून ५-६ पेट्या काढून टेबलावर ठेवतात.)

शरद — (प्रवेश करीत) छट्. काय चहा होता का काढा ?

शिरीन — हां. नाहींच आवडायचा तुम्हांला! घरचा होता ना तो! इराण्याकडचा चहा ढोसायची सवय झाली आहे तुम्हांला; हा कसा आवडेल ?

बाबा — हंऽ! उठलांत आणि ती जाहिरात कसली दिली आहे ?

शरद — जाहिरात ? मीं ? कुठं ? कधी ?

बाबा — अहो, तुमची जाहिरात वाचून माणसं यायलासुद्धा लागलीं.

शरद — हां हां! ती जाहिरात होय ?

शिरीन – बाबा, म्हणजे तुम्ही वाचलीत का ती ?

बाबा – वाचली नाही तशी आम्ही; पण समजलों. स्वयंपाकाला माणूस पाहिजे तुम्हांला. ठेवा. जरूर ठेवा. माणसांनी जर तरुणपणीं चैन करायची नाही, तर काय म्हातारपणीं ? अहो, तुमचे तुम्ही मिळवणार – तुमचे तुम्ही खर्च करणार. आम्हांला त्यांत कांही वाईट वाटायचं नाही.

शिरीन – पण बाबा, माणसं कोण आलीं होतीं म्हणालांत ?

बाबा – एक म्हातारा आला होता आपल्या मुलीला घेऊन.

शरद – मग तो गेला कां ?

बाबा – नाही नाही. गेला नाही. आपल्या मुलीला खाली उभी करून वर पाहायला आला होता, तुम्ही आहांत कीं नाही तें. तिला आणायला गेलाय तो. येईल तो आता. (बसतात.)

शरद – अन् बाबासाहेब, तुम्ही काय बाहेर निघालां होतां वाटतं ?

बाबा – हो. होता विचार. पण नाही जात आता —

शरद – नाही बाबासाहेब. तसं कांही तुम्हांला काम असेल तर तुम्ही नका थांबूं. आम्ही ठरवूं सगळं.

शिरीन – आणि तुम्हांला त्या गणूकाकांना भेटायला जायचं होतं ना ?

शरद – गणूकाका का ? मग तर तुम्हांला उशीरच झाला कीं ! ते एकदा बाहेर पडले म्हणजे मग संध्याकाळपर्यंत निश्चिती.

बाबा – आलं आमच्या लक्षांत. एकंदरींत आम्ही तुम्हांला इथं थांबायला नको आहोंत. जातों मी. पण हें पाहा, उगीच कांही भलत्यासलत्या अटी कबूल करूं नका त्यांच्या. काय ठरवायचं तें व्यवहार संभाळून ठरवा. (जातात.)

शरद – हं आली कीं नाही प्रचीति ? काय सांगत होतों मी ! "मी

लग्नाला उभा राह्यलों तर पोरींच्या झुंडीच्या झुंडी मला सांगून येतील." उजाडलं नाही तों झाली सुरवात.

शिरीन – हं. घी देखा लेकिन् बडगा नहि देखा.

शरद – पण घी आहे ना? बडग्याचं पाहूं पुढं. पण तूं मात्र मधें धडपडतां कामा नयेस. मी म्हणेन त्याला हो ला हो दिला पाहिजेस. नाही तर—

शिरीन – सांगितलं ना मी एकदा, कीं 'पुरुषांच्या मार्गांतली धोंड होणारी स्त्री मी नव्हे म्हणून!' तुम्ही बैल गाभणा म्हणालांत तर मी नववा महिना म्हणून सांगेन.

शरद – वा! वा! आहेच तुझं माझ्यावर तसं प्रेम. ठीक आहे. होऊन जाऊं दे. (जाऊं लागतो.)

शिरीन – कां हो? कुठं निघालांत?

शरद – पाहूं तरी मुलगी कशी काय आहे ती!

शिरीन – हं. उतावळा नवरा न् गुडघ्याला बाशिंग. (त्याला ओढून आणून खुर्चीवर बसविते.)

शरद – गप बस हं! हें असं नाही चालायचं. तं कबूल काय केलं होतंस?

शिरीन – अहो, पण इतकी घाई काय आहे? येईल की आता ती.

(आंतून आवाज) – मी मुळींच येणार नाही. तात्या, तुम्ही माझ्या अंगाला हात लावूं नका. (शाळिग्राम आपली मुलगी शालन हिच्या दंडाला धरून तिला आणतात.) किती वेळ मला खाली उभी करून ठेवली होतीत!

शाळिग्राम – अग-- अग-- पण—

शरद – नमस्कार. (शिरीन् उठून दूर टेबलाजवळ जाऊन बसते.)

शालन – नमस्ते.

शरद — बसा ना.

शाळिग्राम — हं. आमची मुलगी.

शरद — आणि आपलं नांव ?

शाळिग्राम — विसूतात्या शाळिग्राम. आम्ही समोरच राहतों. आपली जाहिरात पाहिली, आवडली आम्हांला. म्हटलं ताबडतोब जावं. हो, शुभं च शीघ्रम्.

शरद — अहो, पण त्यांची इच्छा नव्हती तर त्यांना तसदी द्यायची कांही जरूर नव्हती !

शाळिग्राम — अहो, तसदी कसली त्यांत ? तिची इच्छा नव्हती असं नव्हे. ती आमच्यावर रागावल्येय !

शरद — म्हणजे ?

शाळिग्राम — त्याचं असं झालं; तुमच्याकडे म्हणून मघाशी आलों आणि हिला खाली उभी करून ठेवली. मी वर आलों तों तुमचे पाहुणे——

शरद — हो, बाबासाहेब.

शाळिग्राम — त्यांची गांठ पडली. हिला खाली उभी करून ठेवली होती, हें विसरूनच गेलों. बसलों त्यांच्याशीच बोलत. झालं, रागावली ही आमच्यावर. अहो, आमचं हें असं होतं. बरंऽ (शिरीनकडे बोट करून) ह्याऽ कोऽण ? आपल्या भगिनी वाटतं..

शरद — अंऽ.... हो !

शाळिग्राम — मग त्यांना बोलवा की इकडे.

शरद — त्याचं काय आहे, तिला जरा ऐकूं येत नाही नीटसं; तेव्हा चार माणसांत बसायचं टाळते ती.

शाळिग्राम — अस्सं ! च्——च्——च् ! बाळ, त्यांना नमस्कार कर बरं!

शरद – ताई, मुलगी नमस्कार करत्येय. आशीर्वाद दे की. आणि इकडे येऊन बस ना. आपलींच माणसं आहेत तीं. आता असं करून कसे चालेल ? ( रागारागाने येऊन बसते. ).

शाळिग्राम – शरत्कुमार, तुम्हांला एक गंमत सांगतों. काल तुमचं बिऱ्हाड आलं तेव्हा आम्ही आमच्या गॅलरीत उभे होतों. तुमचं खेळीमेळीचं वागणं पाहून आम्हांला वाटलं तुम्ही नवरा-बायकोच आहांत म्हणून. काय शालन ?

शालन – म्हातारपणामुळं तुम्हांला दूरचं दिसत नाही, म्हणून तुम्हांला वाटलं असेल तसं. पण मी अगदी बारकाईनं पाहात होतें ना; मला मुळींच वाटलं नाही तसं. बहीण–भावंडंच वाटलीं मला.

शरद – वा: ! फारच सूक्ष्म आणि मार्मिक दृष्टि आहे यांची.

शाळिग्राम – होऽ ! बरं, आता होऊं द्या वधुपरीक्षेला सुरुवात.

शालन – ( वधुपरीक्षेच्या पवित्र्यांत बसते. ) हं बघा. आणि लवकर सांगा काय तें.

शिरीन – काय म्हणताहेत त्या ?

शरद – नाही. अजून कांही नाही. शाळिग्राम, मला हें पसंत नाही. त्यांना वर बसायला सांगा.

शाळिग्राम – पण– (शालन खुर्चीवर बसते.)

शरद – आपलं नांव.

शालन – शालन.

शिरीन – असं तोंडांतल्या तोंडांत काय बोलताहेत त्या. काय नांव म्हणालांत ? त्राटिका ?

शालन – नव्हे—नव्हे, शालन.

शिरीन — अग बाई, केवढ्यांदा ओरडताहेत ह्या. वरं दादासाहेब-माहे-रचं नसलं तरी सासरचं नांव हेंच ठेवायचं बरं का.

शरद — ताई, तूं नेहेमी असं करतेस म्हणून आज अशी माझ्यावर जाहिरात देण्याची पाळी आली. उगीच कुणाचा अपमान करायचा म्हणजे काय ?

शाळिग्राम — छे—छे ! अपमान कसला त्यांत ? कितो झालं तरी तुमचा वरपक्ष.

शरद — म्हणून काय झालं ? हें पाहा, आम्हांला कांहीसुद्धा प्रश्न विचारायचे नाहीत. ह्यांनाच कांही विचारायचं असेल तर विचारूं द्या.

शाळिग्राम — छे—छे ! तो काय विचारणार ?

शिरीन — तसं नको. मग मागाहून नको असंच झालं न् तसंच झालं म्हणायला. आताच हडसून खडसून विचारूं द्या. विचारा हो.

शालन — कां हो विचारूं ना ? नाही तर म्हटलं पुरुष आहांत. आधी विचारा म्हणून म्हणाल आणि मग विचारलं म्हणजे रागवाल.

शरद — छट् मी पक्का नवमतवादी आहें. आपल्या कोणत्याहि प्रश्नाचा मी खिलाडू वृत्तीनंच स्वीकार करीन. मिस् शालन, आपण खुशाल विचारा.

शालन — आपण नमस्कार घालतां का ?

शाळिग्राम — कोपरापासून नमस्कार असो तुला. आज नमस्कार घालता का म्हणून विचारते आहेस ! उद्या आणखी कांही विचारशील.

शरद — मिस्टर शाळिग्राम, तुम्ही मधें मधें बोलून त्यांना अडवणार असाल तर माझा एकदम नकार कळवीन तुम्हांला.

शाळिग्राम — नकार ? हरे राम शरद्कुमार कुणी नकार म्हटलं की अंगावर शहारे येतात. आतां नाही बोलत.

शरद — मिस् शालन. विचारा.

शालन — माझ्या मघाच्या प्रश्नाचं उत्तर ?

शिरीन — उत्तर काय देणार ? नमस्कार म्हणजे काय हें माहिती पाहिजे ना ?

शरद — नमस्कार नाही घालत बुवा. नेक्स्ट.

शालन — आपण झोपतां कुठं ? उघडया हवेंत का दारं खिडक्या बंद केलेल्या खोलींत ?

शरद — या बाबतींत मात्र ताईला माझ्याबद्दल कांहीच बोलतां येणार नाही. ही नको नको म्हणत असतां मी उघडया हवेंत गच्चीवर झोपतों. ताई, मुलगी काय मार्मिक प्रश्न विचारते आहे बघ. मि. शाळिग्राम तुमची मुलगी म्हणजे कोहिनूर आहे. नेक्स्ट, मिस् शालन—

शालन — आपले वडील न् मातोश्री कुठं असतात ?

शाळिग्राम — असतील कुठंहि. तुला काय करायचंय ? तुला लग्न कांही त्यांच्याशीं करायचं नाही. त्यांतून स्थळांतल्या इतर चवकशा करण्याचं काम माझं आहे. तू आपली मुख्य मुद्यांकडे बघ म्हणजे झालं.

शालन — बरं आहे. नाही विचारीत तो प्रश्न.

शरद — Anything more Miss Shalan ?

शालन — Nothing Mr. Sharadkumar. मीं तुम्हांला माझे प्रश्न विचारले. आता तुम्हीं मला आपले प्रश्न विचारले पाहिजेत.

शरद — नाही, पण मला कांहीच विचारायचं नाही.

शालन — नाही. तसं कांही चालायचं नाही. तुमच्या ताई म्हणतात तेंच बरोबर आहे. दोघांनाहि एकमेकांची संपूर्ण माहिती झालीच पाहिजे.

शरद — बरं विचारतों. आपलं शिक्षण कुठपर्यंत झालंय ?

शालन — यंदाच बी. ए. ऑनर्सला बसलें आहें मी.

शिरीन — काय ? अनर्से करतां येतात आणि जिलबी, घीवर, मांडे—

शाळिग्राम — नाही नाही. बी. ए. च्या परीक्षेला बसली आहे. आणि फर्स्ट क्लास मिळवणार म्हणते.

शिरीन — मला नाही वाटत तसं !

शरद — हं: ! तुला काय कळतंय ? ह्यांना क्लास मिळणार नाही म्हणजे काय ?

शाळिग्राम — नाही. त्या म्हणतात त्याप्रमाण यदाकदाचित् नाही मिळाला, म्हणून काय झालं ? अहो. परीक्षा म्हणजे लॉटरी आहे नुसती. त्यांतून मी म्हणतों पोरींना क्लास मिळवून करायचं आहे काय ? पोरींनीं क्लास मिळवण्यापेक्षा नवरा मिळवला म्हणजे झालं.

शरद — तें खरं ! पण शिक्षण पाहिजेच.

शिरीन — कशाला ?

शरद — वा: ! शिक्षणाशिवाय संसारांत काय होणार आहे ? शिक्षण पाहिजेच. इतकंच नाही तर सहशिक्षण पाहिजे. काय हो, सहशिक्षणाबद्दल तुमचं काय मत आहे ?

शालन — सहशिक्षण पाहिजेच. सहशिक्षणानं मुलांमुलींची बुद्धिस्पर्धा लागते. त्यांत मुलींच्या बुद्धिवर्चस्वामुळे—

शरद — सहशिक्षण—बुद्धिस्पर्धा—बुद्धिवर्चस्व—काय मुलगी बोलत्येय !

शालिग्राम – शरद्कुमार, माझी मुलगी बंगालमध्यें जन्माला आली असती तर तिचं काय झालं असतं हो ?

शरद – हो. पण आतां काय त्याचं ? तुमचं कर्तृत्व जबर म्हणून असलं हें सर्वांगपरिपूर्ण-पाणीदार–रत्न तुमच्या पोटीं आलं.

शिरीन – हं. पण या पाणीदार रत्नाला स्वयंपाक करतां येतो का ?

शालन – स्वयंपाक ? लग्न झाल्यावर स्वयपाक करीत बसायला कांही इतकी शिकल्ये नाही मी.

शालिग्राम – वा: ! म्हणजे काय बोलणं झालं ! ती काय सांगते ! सगळा स्वयंपाक येतो तिला. आमच्या हिला स्वयंपाकांत सगळी हिचीच मदत असते ना ? थोडक्यांत सांगायचं म्हणजे आमची मुलगी हा एक नव्या–जुन्याचा गोड संगम आहे. नव्या युगाप्रमाणं गोल नेसून, पाठीवर शेपटं सोडून ती कॉलेजांतहि जाते; आणि उभं नेसून घरांतली झाडलोट करण्यांतहि ती तरबेज आहे. संध्याकाळी शुभंकरोति न् रामरक्षा म्हणायचा गेल्या दहा वर्षांचा परिपाठ आहे तिचा. संध्याकाळीं रामरक्षा म्हणते म्हणजे तिला, 'जमुना जळीं' न् 'रमत्या कुठें ग कान्हा' येत नाही असं समजूं नका हं तुम्ही. तसंच वाचण्याबद्दल. आम्ही केसरीचेहि वर्गणीदार आहेंत आणि नवयुगचेहि आहोंत.

शरद – ऐक ऐक; ताई ! मुलगी तुझ्यासारखी कांहीं एककल्ली नाही. तिला नव जुनं ह्या दोहोंबद्दलहि पूर्ण आदर आहे.

शिरीन – ओरडूं नका. ऐकूं आलं मला. बरं, आपलं घर गांवा-पासून इतकं दूर आहे; मंडईंत जाऊन भाजी आणतील का त्या ?

शालन – मीं भाजी आणायची ? मग गडी नोकर कशाला ?

शिरीन — छान ! नोकरांवर मंडई सोपवायची, म्हणचे मग.मालकाचं दिवाळंच.

शाळिग्राम — नाही. आमची मुलगी नोकरांवर कांही सोपवूं देणार नाही. तशी हिशेबी आहे ती. सायकलवर बसतां येतंच की तिला.

शरद — होय का ?

शालन — होय. सायकलवरूनच मी कॉलेजांत जातें. गेल्या पांच वर्षांचं प्रॅक्टिस आहे माझं.

शाळिग्राम — आमची मुलगी सायकलवर बसतेसुद्धां छान हं. अरे स्पीड म्हणजे काय आहे महाराजा ! वारे वा ! अगदीं बुधवारांतून सांगा नी ! अशी बेधडक जाईल म्हणतां ?

शिरीन — दिसतंच आहे तें. अहो आजोबा, आपल्या ह्या गुणी रत्नाला असं घरोघरीं दाखवीत हिंडण्यापेक्षां ताराबाईच्या सर्कशींत कां नाही पाठवलीत ?

शरद — ताई, हें मात्र फार झालं हं ! तुला असलं बोलायचं असलं तर तूं आंत जा पाहूं कशी !

शाळिग्राम — असूं द्या. असूं द्या. आम्हांला विनोद आवडतो. हें पाहा, आमच्या मुलीच्या अंगांत जसे हे मर्दानी गुण आहेत, तसंच गाणं, वाद्य वाजवणं, भरतकाम करणं, असल्या नाजुक जनानी कलाहि तिच्या अंगांत भरपूर आहेत.

शरद — अस्सं ! गाणंहि येतं यांना ? आमच्या ताईला ऐकूंच येत नाहीं. तेव्हा तिच्या बाबतींत गाण्याचं नांवच नको. बरं, कुठलीं कुठलीं गाणीं म्हणतां येतात ह्यांना ?

शाळीग्राम — अहो, शान्ता आपटेचीं न् मीनाक्षीची गाणीं अशीं झकास म्हणते आमची मुलगी ! आता आमच्या कुटुंबाला कांही हीं

सिनेमांतलीं गाणीं आवडत नाहीत. पण मी म्हणतों, मुलीला नवरा मिळवायचा आहे आणि अलीकडच्या मुलांना सिनेमांतली गाणीं आवडतात ! तसं आमच्या कुटुंबाला गाणीं हा प्रकार आवडत नाही असं नाहीं हं. मी जसं 'मी कुमार तीहि कुमारी' 'वैशाखमास वासंतिक' गुणगुणतों, तसं तीहि अधूनमधून 'या तरुणा तांबुल द्याया लाज वाटते' 'मला मदन भासे' वगैरे गाणीं म्हणते. तेव्हा सांगायचं कारण इतकंच की आमची मुलगी उत्कृष्ट गाते. आणि हा तिचा गुण आनुवंशिक आहे.

शरद – ठीक आहे. मग सांगा की त्यांना एखादं सुंदरसं भावगीत म्हणायला. ताई, गाणं म्हणताहेत त्या.

शिरीन – गाणं ! आणि कुलीन स्त्री. हें काय मुलगी दाखवणं चाललं आहे, की गाण्याची बैठक आहे !

शरद – झालं. अगदीच सनातनी आहेस. ताई, मी सांगतोंय त्यांना एखादं सुंदरसं भावगीत म्हणायला.

शिरीन – मग म्हणूं दे. बरं झालं मला ऐकूं येत नाही तें. सुटलें मी त्या पापांतून.

शालन – **संपली निशा । उजळल्या दिशा ॥**
**अरुण किरण येत वरी क्षितिजिं दूरशा ॥ध्रु०॥**
**कोवळी कळी । एक उगवली ॥**
**मधुगुपितें गुणगुणते अन्तरांतली ॥१॥**
**मुग्धशा तिला । किरण भेटला ॥**
**तनु सगळी थरथरुनी मोद बहरला ॥२॥**
**काय जाहलें । तें कुणा कळे ॥**
**अन्तरिचें गूढ परी प्रकट जाहलें ॥३॥**

शरद – वा छान् ! आता ह्यावर गरमागरम चहा पाहिजे बुवा. ताई, तीन कप चहा करून आण ना.

शिरीन – माझं अडलंय–गड्याला सांगा की आपल्या.

शरद – अरे विठू, तीन कप चहा करून आण बरं.

शिरीन – म्हणजे ? तुम्ही घेणार नाही वाटतं ?

शरद – वा ! मी घेणार ना ? मला वाटलं तुला नको असेल ! विठू, चार कप कर हं.

शाळिग्राम – अहो गड्याला कशाला सांगताय ? तो काय करणार ? आमची शालनच आणील की फक्कडसा चहा करून ! उठ बरं बाळ ! जा पाहा तरी खरी आमची शालन कशी सुंदर चहा करते ती. (शालन आंत जायला लागते.)

शिरीन– रखमा. या चहा करायला आंत येताहेत. दूधसाखरेवर नीट देखरेख ठेव हं.

रखमा – हां ! (दोघी जातात.)

शाळिग्राम – हं. मग काय शरद्कुमार ! आमची शालन एकंदरींत तुम्हांला पसंत पडली ?

शरद – हो. अगदी सोळा आणे.

शाळिग्राम – बरं झालं. सुटलों एकदाचा. मग आता केव्हा ?

शिरीन – केव्हा काय ?

शाळिग्राम – अहो लग्न !

शिरीन – कुणाचं ?

शाळिग्राम – म्हणजे हें काय विचारणं ? अहो. यांचं अन् शालनचं.

शिरीन – मी इथं जिवंत असतांना ह्यांचं न शालनचं लग्न होणार नाही.

शरद – म्हणजे काय ग ताई ? तूं कबूल केलं होतंस ना की तूं माझ्या लग्नाच्या आड येणार नाहीस म्हणून ?

शिरीन – म्हणून काय झालं ? म्हणे सोळा आणे पसंत आहे. काय भाळलां आहांत तिच्यावर कुणास ठाऊक ! मला हें असलं मुळींच खपायचं नाही. काय मुलगी आहे का म्हसोबा !

शरद – अगअग ! अग तुला पसंत नसली तर नीट सांग. अशा शिव्या काय देतेस ? हें पाहा शाळिग्राम, तिच्या शब्दाकडे तुम्हीं लक्ष देऊं नका. तिची मोठी चमत्कारिक परिस्थिति आहे. म्हणजे तिच्या ह्या बहिरेपणाच्या खोडीमुळं तिचं स्वतःचं लग्न कुठं जमत नाही. त्यामुळं ती असा त्रागा करते, आणि दुसऱ्या कुणाचं-- त्यांतून मी तिचा आवडता भाऊ-- तेव्हा माझं कुठं लग्न जुळायची वेळ आली, की ही असा मोडता घालते.

शाळिग्राम – मग बिकटच काम आहे म्हणायचं !

शरद – हो आहे खरं. पण करायचं काय ? आपलेच दांत आणि आपलेच ओठ.

शाळिग्राम – (शरदला एका बाजूला घेऊन) मग का हो असं केलं तर ?

शरद – कसं ?

शाळिग्राम – ह्यांना नकळत कुठं क्षेत्राच्या ठिकाणीं जाऊन मुकाट्यानं लग्न उरकून घेतलं तर ?

शिरीन – काय म्हणताहेत ते ? कुजबुजतां काय ? कांही कारस्थानं चाललीं आहेत वाटतं माझ्याविरुद्ध ?

शरद – अग, ते तुझ्यासाठी एक स्थळ सांगताहेत.

शिरीन – होय का ? त्यांना म्हणावं मला नाही लग्न करायचं. आपल्याच मुलीला द्या तिथं.

शरद – पाह्यलंत शाळिग्राम ? आपण तसं कांही केलं--अन् मागाहून तिला कांही कळलं--तर जीवसुद्धा देईल ती.

शाळिग्राम – मग आता काय करायचं ?

शरद – Yes ! that's a situation indeed !

शिरीन – गडकऱ्यांच्या भावबंधनांतलं वाक्य आहे तें.

शाळिग्राम – वा वा ! काय स्मरणशक्ति आहे ? तेवढे कान शाबूत असते तर!

शरद – होय ना ? म्हणून तर तिच्याबद्दल इतकं वाटतं. अतिशय बुद्धिमान्, प्रेमळ—आणि माझ्यावर तिचा इतका जीव, की जणूं काय मी तिची अगदी खाजगी प्रॉपर्टी आहें असं तिला वाटतं.

शाळिग्राम – वा ! भावाबहिणींचं इतकं प्रेम आपल्याला कुठं पाहायला-सुद्धा मिळायचं नाही.

शरद – म्हणूनच तिला दुःख देऊन–तिला एकटी टाकून – आपणच लग्न करून सुखी व्हावं, ही कल्पना कशीशीच वाटते; नाहीं का ?

शाळिग्राम – (घुटमळत) हो. पण ! नाहीं. तसं कांही नाही.

शरद – नाही म्हणून कसं चालेल ? तसंच आहे तें. स्वार्थासाठीं स्वतःची अशी फसवणूक करून घेण्यांत काय अर्थ आहे ? Mr. Shaligram ! I am very sorry. तुमची मुलगी मला एकदम पसंत आहे; पण ताईचं लग्न झाल्याशिवाय—कसं सांगूं तुम्हाला—मला तुमच्या मुलीशीं लग्न नाही करतां यायचं.

शाळिग्राम – हरे राम ! हरे राम ! हरे राम ! पुन्हा नकार. सर्व कांही ठीक जुळत आलं होतं, तों इथं हें आडवं आलं. देवा, तूंच आता माझा पाठीराखा—तूंच आता लाज राख माझी. ( बसतो.)

बोकील – ( प्रवेशून ) शिरीन, शिरीन, शिरीन. ( सर्व उभे राहातात. शालन आंतून चहाचा ट्रे घेऊन येते. )

शिरीन – कोण ? कोण पाहिजे आपल्याला ?

बोकील – शिरीन—शिरीन. ( दोघींकडे बघतो )

शरद – अहो मेहेरबान ! पण तुम्ही कोण आहांत ?

बोकील – मी ? फरहाद.

शालन – फरहाद—

बोकील – शिरीनसाठी आलों आहें मी. ( शालनला उद्देशून ) शिरीन !

शाळिग्राम – अहो, ती माझी मुलगी आहे. तिचं नांव शालन— ह्यांचं नांव शिरीन.

बोकील – शिरीन— ?

शिरीन – पण तुम्हांला माझं नांव कुणीं सांगितलं ?

बोकील – तुमच्या ह्या प्रेमपत्रिकेनं ( पत्र काढतो. )

शरद – शिरीन, काय आहे हें ? कालचं तें पत्र तूं ह्यांना लिहिलं होतंस वाटतं ? For Shame ! असं कांही तूं करशील असं मला मुळींच वाटलं नव्हतं.

शिरीन – नाही. मीं कुणालाच पत्र लिहिलं नाही.

शरद – मग यांना हें पत्र कसं मिळालं ? काय हो फरहाद, पाहूं द्या तें पत्र ? मी ह्या घराचा मालक आहें.

बोकील – हें पत्र ? नाही. त्याची जागा इथं आहे—मालक—
( पत्राचें चुंबन घेतो व कोटाच्या आंतील खिशांत ठेवतो).

शालन – फरहाद ! तुम्हीं यांना पत्र लिहिलं नव्हतंत तर मग कुणाला लिहिलं होतंत ?

शिरीन – कुणालाच नव्हतं—कांहीतरी नांव लिहायचं म्हणून हाताला येईल तें खरडलं.

शाळिग्राम – हं! इथं कांही तरी घोटाळा दिसतोय. काय नांव नी पत्ता लिहिला होतात तुम्हीं ?

शिरीन – सखारामबापू बोकील, पीरवाडी, पुणें! पण यांचं नांव तर फरहाद आहे.

बोकील – नाही. ह्या देहाचं खरं नांव सखाराम बापू बोकील असंच आहे.

शाळिग्राम – आंऽ काय हो ? तुमचं नांव सखाराम बापू बोकील कीं फरहाद ?

बोकील – माझं नांव सखाराम बापू बोकील आणि फरहाद ही माझी सध्याची अवस्था.

शिरीन – यांचं नांव सखाराम बापू बोकील असेल! योगायोगानं तें तें नांव जुळून आलं असेल! पण मला हें माहीत नव्हतं—यांना मीं कधीच बोलावलं नव्हतं. दाखवा तें माझं पत्र साऱ्यांना.

बोकील – प्रेमाच्या आज्ञेची कोण अवज्ञा करील ? (पत्र दाखवितो.)

शालन }
शरद } – अहो, हें काय ? हा तर कोरा कागद आहे ?

बोकील – होय! उथळ नजरेनं पाहणाराला तें कोरें दिसेल; पण ज्याला प्रेमाची दृष्टि आली आहे—ज्याला हृदयाची भाषा वाचतां येते—त्याला या कोऱ्या पत्रांत काय दिसणार नाही ? पाहा. या कोऱ्या पत्राकडे पाहा. हें कोरं पत्र म्हणजे यांच्या निर्मळ हृदयाची जाहिरात आहे. शकुंतला,

रुक्मिणी, दमयंती यांना शब्दांच्या साहाय्यानं जो आपल्या हृदयांतील प्रेमाचा प्रवाह प्रकट करतां आला नसेल, त्या प्रवाहाचा प्रचंड धबधबा ह्या कोऱ्या पत्रांतून नुसता ओसंडतो आहे. शाब्दिक दगडाधोंड्यांनी आजपर्यंत अनेक प्रेमी पिसाटांनी आपल्या प्रेममंदिराचा पाया रचला असेल, पण या कोऱ्या पत्राच्या रूपानं, मुंबईच्या 'गेट वे ऑफ इंडिआ' प्रमाणं, यांनी आपल्या प्रेममंदिराचं भव्य महाद्वार उभारलं आहे.

शरद – पण त्या महाद्वारांतून शिरण्याचा पासपोर्ट तुमच्याजवळ आहे का?

बोकील – प्रेमाच्या प्रदेशांत पासपोर्ट आणि परवाने यांची काय पर्वा?

शाळिग्राम – पण काय हो फरहाद, तुमच्या प्रेमाचं हें भडकलेलं तारूं, नेमकं याच बंदराला येऊन कसं थडकलं?

बोकील – कसं? या कोऱ्या पत्राच्या कोपऱ्यांतल्या ह्या चिमुकल्या लाईटहाऊसकडे पाहा. यांतून निघणाऱ्या प्रकाशाच्या झोतानं हा मार्ग मला दाखवला. 'शिरीन C/o शरद्कुमार शहाणे, ३६/२ अ, शनवार पेठ, पुणें.' पण प्रेमाच्या पाऊलवाटेवर पत्थरांची पाखरण पसरलेली असते. प्रचंड प्रयासानं पायपीट करीत, पत्ता हुडकीत, मी तिथं गेलों; पण—

शाळिग्राम – काय झालं हो?

बोकील – परकी पाहुण्याची पूसतपास तिथं कोण करणार? या हृदयाची अधिष्ठात्री देवता—या फरहादची शिरीन्— आधीच तिथून बिऱ्हाड बदलून बाहेर पडली होती. पण प्रेमाला पराभवाची काय प्रतिष्ठा? प्रियतमेसाठी पृथ्वीला पालाण

घालायला प्रवृत्त झालेल्या फरहादप्रमाणं, दुप्पट उत्साहानं मी फिरून शोध करायला लागलों आणि भटकत भटकत, भेटेल त्याला माझ्या प्रेममंदिराचा मार्ग विचारीत विचारीत, अखेरीस मी इथं येऊन पोहोंचलों.

शालन — (कौतुकानें) अगबाई! खरंच! किती थकलां असाल तुम्ही! बसा ना! थोडा चहा घ्या ना. (चहा देते)

वोकील -- आहाहा! स्त्रीहृदय! किती कोमल! किती सहृदय! (चहा घेतां घेतां) किती गोड! अगदी इराण्याच्या चहापेक्षाहि चवदार.

शाळिग्राम — अरे, खरंच की! आपला चहा निऊनसुद्धा गेला असेल. शालन्, ताईसाहेबांना दे चहा. (आपण स्वतः शरद्‌ला देतो.) शरत्कुमार, ही घटना चमत्कारिक तर खरीच, पण हा योगायोग मोठा विलक्षण आहे. आताच आपण ह्यांचं लग्न न झाल्यामुळं उत्पन्न झालेल्या पेचप्रसंगांत सांपडलों होतों; पण काय चमत्कार आहे पाहा. देवाघरीं ह्यांची वरयोजना आधीच झालेली होती. अगदी देवानं धाडून दिल्यासारखा हा वर आपल्या पायांनी इथं चालत आला.

शरद — देवबीव मी जाणत नाहीं. इथं आगांतुकाची सोय होणार नाहीं.

शाळिग्राम -- अहो, यांत आगांतुकी कसली? ही आपली सनातनी परंपरा आहे. वधूनं वराच्या घरीं जायचं, हें खरं नव्हेच. वरानं वधूच्या घरीं जाऊन मागणी घालायची, हाच खरा धार्मिक प्रघात.

शिरीन — मग काय हो आजोबा, तुम्ही आपल्या मुलीला इथं कशाला दाखवायला आणलीत?

शाळिग्राम — अंऽऽइं! सांगितलं ना मघाशी, की आमचं म्हणजे म्हटलं तर नवंहि आहे, म्हटलं तर जुनंहि आहे. बरं फरहाद, आपले वडील आणि मातुःश्री कुठं असतात?

शरद – मसणांत. अहो, त्यांची चौकशी करून तुम्हांला काय करा-यचं आहे? मुख्य मुद्दा हा आहे, की मी इथं असतांना हिचं लग्न ह्यांच्याशीं होणं शक्य नाही.

शिरीन – म्हणजे काय? मघाशी माझ्याकरता स्थळं पाहाण्याचीं तुमचीं कारस्थानं चाललीं होतीं; आणि आता हे चांगले वडीलपणीं पुढाकार घेऊन चौकशी करताहेत, तर तुम्हो कां त्यांना अडवतां? विचारा हो तुम्ही!

बोकील – Thank you very much Madam. मुंबईचे प्रख्यात दिवंगत बॅरिस्टर बापूसाहेब बोकील यांचे आम्ही एकुलते एक चिरंजीव.

शाळिग्राम – अस्सं अस्सं! म्हणजे आमच्या बापूसाहेब बोकिलांचे आपण चिरंजीव का? वा वा! छान! म्हणजे मग पुढे कांही विचारायलाच नको.

बोकील – वा! आमच्या आयुष्यांतला अद्भुतरम्य कथाभाग तर पुढंच आहे. आमची आई लहानपणींच वारली.

शरद – सुटली विचारी.

बोकील – वडलांचं आमचं पटेना.

शरद – बरोबर आहे. कसं पटणार?

बोकील – हो. आमचा मार्ग वेगळा. त्यांचा मार्ग वेगळा. पुस्तकांचीं पानं पाठ करून पास व्हावं, असा त्यांचा आग्रह; तर वाजाच्या पेटीच्या पट्ट्यांतून सुस्वर स्वरांचा नावीन्यपूर्ण नाच कसा करायचा, याची आम्हांला हौस. आमचं करणं त्यांना आव-डलं नाही; त्यांचं म्हणणं आम्हाला पटलं नाही! शेवटीं एक दिवस घरांतून पळून गेलों.

शालन – पळून गेलांत? How romantic! पुढं?

शरद – पुढं काय ? गेले असतील एखाद्या संगीत नाटक कंपनींत.

बोकील – नाही. नाटक कंपनींत नाही— सर्कशींत गेलों आम्ही !

शाळिग्राम – सर्कशींत ? अहो, संगीताचा आणि सर्कशीचा काय संबंध ?

बोकील – हा आपल्यासारख्या लोकांचा गैरसमज आहे. सर्कशीचा आणि संगीताचा फार घनिष्ट संबंध आहे. मरहूम रहिमतखां यांना छत्र्यांच्या सर्कशीनं पुढं आणलं; सर्कशीचे मॅनेजर झाल्यामुळंच आपल्याला अनेक प्रदेश पाहायला मिळाले, आणि बड्या बड्या खानदानी गवयांचीं गाणीं आपल्याला ऐकायला मिळालीं; असं स्वतः गुरुवर्य गोविंदराव टेंबे यांनी कुठं तरी म्हटल्याचं आम्हीं ऐकलंय! ह्या महात्म्यांचा मागोवा घेऊनच आम्हीं सर्कशींत पाऊल टाकलं.

शालन – तिथं आपण काय काम करीत होतांत ?

बोकील – कुत्र्यांना आणि माकडांना शिकवण्याचं. ह्या कलेंत माझा हात धरणारा अखिल भरतखंडांत तुम्हाला कोणीहि सांपडणार नाही.

शाळिग्राम – वा ! छान ! आपण मुक्या जनावरांना शिकविण्यांत प्रवीण आहांत; मग ह्यांचा बहिरेपणा तुमच्या विवाहाला घातक ठरण्याचं मुळींच कारण नाही.

शरद – शाळिग्राम, तुमच्या तोंडून झाली, तरी हिची ही अशी नालस्ती मी ऐकून घेणार नाहीं. मिस्टर बोकील, आलांत तसे चालते व्हा इथून.

शिरीन – म्हणजे काय ? उगीचच एखाद्याचा अपमान करायचा म्हणजे काय ? एखाद्यानं कुणाच्या कलेंतल्या कसबाचं कौतुक केलं, तर त्यांत कसली आली आहे नालस्ती ?

आजोबा, तुम्ही यांचं मुळींच मनावर घेऊं नका. मोठी चमत्कारिक परिस्थिति आहे त्यांची. आपली बहीण म्हणजे जणूं काय आपली खाजगी प्रॉपर्टीच वाटते त्यांना.

बोकील – वा ! भावांबहिणीचं इतकं प्रेम क्वचितच कुठं पाहायला मिळेल !

शरद – खड्ड्यांत गेलीं बहीणभाऊ. मिस्टर शाळिग्राम, मिस्टर बोकील, मी हिचा भाऊ नाही— ही माझी बहीण नाही– ती माझी बायको आहे.

शाळिग्राम – अहो काय थट्टा ही ! थट्टेंत झालं तरी बहिणीला बायको म्हणायचं म्हणजे काय ?

शरद – ही थट्टा नाही. खरं तेंच सांगतोंय मी.

शाळिग्राम – म्हणजे? इतका वेळ तुम्ही सांगताहांत, की तुम्ही बहीण-भावंडं आहांत— ह्या बहिऱ्या आहेत, न् आता म्हणतां की ही माझी बायको आहे म्हणून. मग तें खरं का हें खरं ?

शिरीन – तें खरं. यांचं नेहमीचंच हें असं आहे. यांचं माझ्यावर इतकं प्रेम आहे, की माझं लग्न होऊन मी त्यांच्यापासून दूर होण्याची कल्पनाच त्यांना असह्य वाटते. आणि म्हणूनच मला लग्न करायची वेळ आली, की हे असा मोडता घालतात.

बोकील – मोठं बिकटच काम आहे म्हणायचं !

शिरीन – हो, आहे खरं. पण करायचं काय ? आपलेच दांत आणि आपलेच ओठ.

शरद – बस्स झाला हा फाजीलपणा. मी पुन्हा सांगतों, की ही माझी बहीण नाही; मी हिचा भाऊ नाहीं.

बोकील – ( नक्कल करीत. ) ती माझी बायको आहे. मी तिचा नवरा आहें. ऐकलं आम्हीं एकदां तें.

शरद – अहो विदूषक, बाष्कळपणा बस्स झाला. खरोखरच ती माझी बायको आहे.

शाळिग्राम – हरे राम ! हरे राम ! काय सांगतां काय ? म्हणजे आम्हांला प्रथम वाटलं तेंच खरं होतं कीं काय ?

शालन – शक्य नाही. माझी कल्पना कधीच खोटी ठरणार नाही. बहीण–भावंडंच असलीं पाहिजेत हीं.

बोकील – बरोबर आहे यांचं म्हणणं. हा ह्यांचा कांही तरी डाव आहे. काय हो, आपल्या बहिणीचं लग्न होऊं नये, म्हणून आपण ही नवीनच क्लृप्ति काढलेली दिसत्येय !

शरद – बोकील, बकवा बंद कर; नाही तर दांत घशांत घालीन.

बोकील – मिस्टर शरद्कुमार, असल्या पोकळ धमक्यांना भीक घालणारा हा सखारामबापू बोकील नव्हे !

शरद – शिरीन, तूं अशी दगडासारखी स्वस्थ कां बसलीस ? सांग–सांग आपण नवरा-बायको आहोंत म्हणून !

बोकील – हां–हां–हां ! असा जबरीनं घेतलेला कबुलीजबाब कायदेशीर नाही. आपल्या बहिणीच्या आयुष्याचा अशा राक्षसी रीतीनं सत्यानाश करणाऱ्या भावाचा आम्ही प्रतिकार केल्याशिवाय राहाणार नाहीं.

शाळिग्राम – अहो– हो ! हो ! पण असे वर्दळीवर कां येतां ? जरा समजुतीनं घ्या.

शालन – तुम्ही नवरा-बायको आहांत याला पुरावा काय ?

शरद – मी सांगतों हाच पुरावा !

बोकील – आरोपीचा जबाब पुरावा ठरूं शकत नाही.

शरद – शिरीन, शिरीन, बोल ना !

शिरीन – काय म्हणताय ? मला ऐकूं येत नाही, हें विसरलांत वाटतं.

शरद – विठू, रखमा ! ( विठू रखमा येतात.) विठू, रखमा, सांगा आम्ही नवरा-बायको आहोंत कीं नाहीं ?

रखमा – आता तुमा मोठ्या लोकांच्या भानगडींत आम्हीं नोकर मानसांनी काय तोंड घालावं ?

शरद – विठू, तूं तरी सांग. आहोंत की नाही आम्ही नवराबायको ?

विठू – म्हंजी ? व्हय तर–हांत की !

बोकील – खात्री आहे तुझी ? हजर होतास तूं लग्नाला ?

विठू – नाय बा. लग्नाला हजर न्हवतों.

बोकील – मग ही ऐकीव माहिती पुरावा म्हणून दाखल करून घेतां येत नाही. ऐनदस्तऐवजी पुरावा पाहिजे.

शाळिग्राम – वा: ! वा रे बॅरिस्टरचा बेटा ! काय एकेक कायदा काढतोय ! गवयाचं पोर सुरावरच रडायचं.

शरद – ऐनदस्तऐवजी पुरावा पाहिजे काय ? आं ? इथला आपला फोटो कुठं आहे ? रखमा, विठू, काय झाला फोटो ?

बोकील – मुळांतच नसला तर येणार कुठून फोटो ? शिरीन, चल, आताच्या आता रजिस्ट्रार कचेरींत जाऊन आपण आपल्या लग्नाची नोटीस देऊं.

शरद – शिरीन, कुठं चाललीस ? बैस इथं. (शरद व बोकील शिरीनचा एकेक हात धरण्याचा प्रयत्न करतात; ह्या ओढाताणींत विठूने टेबलक्लॉथ्खाली लपविलेला फोटो खाली पडतो. )

बोकील – (फोटो उचलून) आऽ हाऽ

शरद – दस्तऐवज पाहिजे ना ! पाहा–नीट डोळे फाडून पाहा.

बोकील — (तुच्छतेने) अं! कांहीसुद्धा सिद्ध होत नाही यावरून. भावा-बहिणींचेसुद्धा असूं शकतात असे फोटो! चल शिरीन. (शरद बोकीलांच्या अंगावर धावून जातो. थोडीशी झटापट होते. झटापट चालू असतांनाच बाबासाहेब येतात.)

बाबा — अरे— अरे— हें काय? मारामारी कसली चालल्येय? शरद्-कुमार, शिरीन, अहो हें आहे काय सगळं? (शाळिग्रामास) काय हो! तुमचं देण्याघेण्याचं वगैरे ठरवून अजून तुम्ही कामाला लागलां नाहीत का?

शाळिग्राम — बरं झालं तुम्ही आलांत. केवढा घोटाळा माजला होता इथं!

बाबा — घोटाळा कसला? हे कोण? काय हो शरद! काय ग पोरी?

शाळिग्राम — मी सांगतों. ह्यांनी 'वधू पाहिजे' म्हणून जाहिरात दिली होती.

बाबा — ह्यांनी? 'वधू पाहिजे' म्हणून जाहिरात दिली होती?

शाळिग्राम — हो. ही पाहा. म्हणून आमच्या मुलीला इथं दाखवायला मी घेऊन आलों.

बाबा — अस्सं. मला वाटलं ह्यांना स्वयंपाकी पाहिजे. हं! 'वधू पाहिजे' काय?

शाळिग्राम — हो. आमची शालन यांना पसंतसुद्धां पडली.

बाबा — हं.

शाळिग्राम — पण मधें तिसरंच विघ्न उपस्थित झालं.

बाबा — काय?

शाळिग्राम — आपल्या बहिऱ्या भगिनीचं लग्न झाल्याशिवाय आपल्याला लग्न करतां येत नाही, असं म्हणायला लागले हे.

बाबा — बहिरी बहीण? कुणाची? कुठली?

शाळिग्राम — म्हणजे काय? तुम्ही सुद्धा आमची थट्टा करायला लागलां वाटतं? तुम्ही यांचे पाहुणे; तुम्हांला माहीत नाही? अहो, या शिरीन ताईसाहेब नाहीत का?

बाबा — अस्सं काय? मग काय ग, तूं सुद्धा जाहिरात दिली होतीस का 'वर पाहिजे' म्हणून?

बोकील — छे— छे— छे! यांच्यासारखी सुंदर स्त्री असली कंगाल, काव्यहीन कृति कशी करील?

बाबा — आँ! आँ!

बोकील — दमयंतीनं हंसाबरोबर, यक्षानं मेघाबरोबर, तसा यांनी या कोऱ्या कागदाच्या रूपानं पोस्टमनबरोबर, आपल्या प्रेमाचा संदेश मला धाडला होता. माझं नांव सखाराम बापू बोकील.

बाबा — म्हणजे एकंदरींत इथं बरंच राजकारण रंगाला आलेलं दिसतंय! मग पुढं ऽ?

शाळिग्राम — तेंच तर कोडं आहे. प्रथम हे सांगत होते, की आम्ही बहीण-भावंडं आहोंत म्हणून; पण आता हे सखारामबापू यांना मागणी घालायला आल्याबरोबर हे म्हणायला लागले, की आम्ही नवराबायको आहोंत म्हणून, आणि गेले यांच्या अंगावर धावून त्यांना मारायला.

बाबा — हं! कांही लागलं बिगलं नाही ना विशेष तुम्हांला?

शालन — अहो पाव्हणे, तुम्हीच सांगा, आहेत का नाहीत हीं बहीण-भावंडं?

बाबा – आता आम्ही सांगून तरी काय उपयोग? आमचं तरी कोण खरं मानणार?

शरद – बाबासाहेब, तुम्हीसुद्धा?

शिरीन – बाबा, आज आई इथं असती तर तिनं कांही असं केलं नसतं!

बाबा – भूल आहे तुझी. आता या परिस्थितींत तिनं तरी दुसरं काय केलं असतं? तुम्हींच भांडणाच्या भोवऱ्यांत सांपडून ही गुंतागुंत करून ठेवली आहे. आता तुम्हींच कांहीतरी काढा त्याला तोड.

शरद – तोड? एकच तोड आहे याला. ही सारी गुंतागुंत तोडून टाकणं ही एकच तोड आहे त्याला.

शिरीन – म्हणजे?

शरद – मी नकोसा झालों आहें ना तुला?

शिरीन – मीं कधी म्हटलं तसं? मीच तुम्हांला नकोशी झाल्यें आहें. यांना पाहिल्यापासून तुम्ही अगदी बावचळून गेल्यासारखे करतांहांत. काय सारखं त्यांच्या पुढं पुढं चालवलंय! त्यांच्या तोंडून शब्द पडायचा अवकाश, की लागलीच धावलांत तुम्ही झेलायला. काय म्हणे यांची दृष्टि सूक्ष्म आहे! प्रश्न मोठे मार्मिकच विचारतात. तुमची मुलगी कोहिनूर आहे. सारखा यांचा स्तुतिपाठ आणि माझा कमीपणा. बरोबरच आहे. मी अशिक्षित, सनातनी—या सुशिक्षित, सुंदर, गाणाऱ्या! यांना पाहिल्यावर मी नकोशी व्हायचीच.

शरद – वाः! छान कांगावा! मघाशी मीं यांना तुझ्यासाठी नकार दिला, हें विसरलीस वाटतं.

शिरीन — तो नुसता वरवरचा मानभावीपणा. करूनसवरून नामानिराळं राहतां आलं पाहिजे ना! म्हणून संधीची वाट पाहात होतांत.

शरद — अस्सं का? आलं माझ्या लक्षांत. तुला यांच्या प्रेमाचा पूर आला आहे, म्हणून कांही तरी माझ्यावर बालंट घेऊन आपला मार्ग मोकळा करून घ्यायचा आहे तुला. ठीक आहे. (सर्वांना) आम्ही नवराबायको असलों, तरी हिच्या सुखासाठी तें नातं तोडायची माझी तयारी आहे.

शिरीन — माझ्या सुखाची तुम्हांला नको काळजी. माझं मी पाहून घेईन. पण माझ्यापासून मोकळे होऊन, यांच्या सहवासांत तुम्ही जर सुखी होणार असलांत, तर मी तुमच्या सुखाच्या आड मुळींच येणार नाहीं.

बोकील — शाब्बाऽऽस.

शरद — तुम्ही गप्प बसा. काय बाबासाहेब?

बाबा — काय ग पोरी?

शिरीन — मी कांहीच सांगत नाहीं. करूं दे त्यांना काय हवं तें.

(रागारागाने आंत निघून जाते. सर्व तिच्याकडे पाहात उभे राहातात.)

— पडदा पडतो —

**अंक दुसरा समाप्त**

# अंक तिसरा

[ स्थळ – पहिल्या दोन अंकांतीलच. वेळ – सकाळ. बाबासाहेब वाचीत बसले आहेत. आंत कपबशी फेकल्याचा आवाज. शरदचा आंतून आवाज. 'चल, चालता हो, मला चहा घ्यायचा नाही.' विठू अंगावर चहा उडालेल्या स्थितींत हातांत कपाचे तुकडे घेऊन येतो. ]

बाबा – काय रे, काय झालं? मला वाटलं धरणीकंप होतो आहे की काय?

विठू – व्हय. साहेब लइ गरम झाल्याती.

बाबा – कां रे, काय केलंस तूं?

विठू – काय नाय बा. नुसता चाय न्येऊन दिला साहेबास्नी.

बाबा – मग काय? चहा गरम होता वाटतं? तोंडबिंड भाजलं की काय त्यांचं?

विठू – हॉं! पिल्याल तर त्वांड पोळल ना! मी चाय घेऊन गेलों, तर येवढ भोपळ्याएवड डोळ करून बघाया लागल!

बाबा – तें कां?

विठू – म्हंगाले, तूं कां चाय आनलास? म्या म्हंगालो रखमा भाईर गेलीया म्हून मीच करून शान आनला.

बाबा – मग?

विठू – मंग म्हंगाले, रखमा गेली चुलींत. बाईसाब कुटं हायत? म्यां म्हंगालो, बाईसाब मोठ्या फाटे उठून फिरायला गेल्यात. तवा येकदम काव्हले– लागले मला शिव्या द्याया– दिला चाय भिरकावून माझ्या अंगावर– आन् पुना कांबरून ओढून शान झोपल न् काय!

ाबा – अस्सं– अस्सं ! बायकोनं चहा आणून दिला नाही म्हणून साहेबांची तब्बेत गरम झाली आहे होय ? छान ! अन् काय रे, शिरीन सकाळींच उठून बाहेर फिरायला गेल्येय होय ?

ठू – व्हय. अन् रखमा म्हणत होती– साऱ्या रातभर बाईसायबांचा डोळ्याला डोळा लागला न्हवता. सारख्या तळमळत होत्या.

ाबा – अस्सं ! अन साहेब कुठं होते ?

ठू – ते झोपले होते भाईर उगड्यावर, गच्चीवर.

ाबा – गच्चीवर ? छान ! (घंटा वाजते.) बघ बरं कोण आलंय तें ?

(शालन रखमा येतात. विठू आंत जातो.)

ालन – कशाला बोलावलं मला ?

ाबा – (हसून) सांगतों– सांगतों. आधी बसा तर खऱ्या ! रखमा, ह्यांच्यासाठी एक कप गरमागरम चहा करून आण बरं !

ालन – मला नाही आवडत मोलकरणीनं चहा केलेला. आताच चहा झालाय आमचा.

ाबा – बरं राह्यलं. (रखमा जाते.) हं. कसं काय ? काल रात्रीं झोपबीप आली होती ना चांगली ?

ालन – हो. काय झालं होतं झोप न लागायला ?

ाबा – नाही. कांही नाही. काल आमच्या शिरीनला नीट झोप लागली नाही म्हणे. म्हणून आपलं तुम्हांला विचारलं.

ालन – हो. चांगलं केलंत. मला अगदी छान झोप लागली होती. मी कांही तुमच्या शिरीनसारखी हळूबाई नाही—एवढयातेवढयावरनं झोप न लागायला. अगदी धरणीकंप होऊन घर कोसळलं तरीसुद्धा माझी झोप मोडायची नाही.

बाबा — छान ! असं पाहिजे. सध्याच्या या धकाधकीच्या मामल्यांत राष्ट्राला अशाच खंबीर मनाच्या महिलांची जरूर आहे.

शालन — राष्ट्राला कशाची जरूर आहे तें पाहूं मग. पण आधी मला इथं कशाला बोलावलंत तें सांगा.

बाबा — हां. म्हणजे त्याचं असं आहे, की तुम्ही तशा खंबीर आहांत; तुम्हांला ह्या गोष्टींचं कांहीच वाटणार नाहीं; पण आम्ही झालों आहोंत म्हातारे— नाही म्हटलं तरी आम्ही थोडेसे हादरलोंय आहोंत कालच्या त्या एकंदर प्रकारानं.

शालन — मग डॉक्टर नाही तर नर्सला बोलवायचं होतंत ! मला कशाला बोलावलंत !

बाबा — छे छे ! अगदी शब्द खाली पडूं देत नाहीं तुम्ही. असं एकेक प्रौढ आणि मोजकं बोलतां—

शालन — तें असूं द्या. कशाला बोलावली होतीत मला ?

बाबा — हो. सांगतो. हें पाहा— (आंत शरद शिंकतो.)

शालन — अं. कोण शिंकतं आहे एवढं ?

बाबा — अहो, दुसरं कोण असणार ? आमचे शरद्कुमार. काल रात्रीं गच्चीवर झोपले होते, तेव्हा सर्दी झालेली दिसतेय.

शालन — हं:! एक रात्र उघड्यावर निजून सर्दी ! (पुन्हा शिंका.) फारच नाजूक प्रकृति आहे म्हणायची यांची. एवढ्यातेवढ्यावरनं या लोकांना सर्दी न् पडशीं कशीं होतात कुणाला ठाऊक ! चांगलं भर उन्हांत मजुरासारखं काम करायला लावलं, म्हणजे सगळी सर्दी न् पडशीं निघून जातील आपोआप.

बाबा — हं: ! (शिरीन व बोकील येतात.) ये. आलीस ? आणि तुम्ही सुद्धा आलांत ? छान् ! (शिरीन बसायला जाते. बोकील आधी जाऊन रुमालानं खुर्ची पुसतो.)

बोकील – हं, आता—

शालन – How chivalrous !

बोकील – Thank you madam.

बाबा – हं. बरीच थकलेली दिसतेस ! आणि यांची कुठं गाठ पडली ?

बोकील – बागेंत ! म्युनिसिपॅलिटींच्या बागेंत !

बाबा – अस्सं–अस्सं. अगोदर दोघं ठरवूनच बरोबर फिरायला गेलां होतात वाटतं ?

शिरीन – –नाही. सकाळीं झोप येईना, म्हणून लवकर उठून बाहेर फिरायला गेलें. तों सहज योगायोगानं बागेंत यांची गांठ पडली.

शालन – वा ! कालपासून यांचे न् तुमचे योगायोग विलक्षणच दिसताहेत.

शिरीन – हो. कालपासून सगळ्यांच्याच बाबतींत घडताहेत योगायोग.

बाबा – हां. होतंय खरं थोडं तसं. म्हणजे एकंदरींत तुम्हालाहि लवकर उठून फिरायला जाण्याची आवड दिसते ?

बोकील – छे– छे ! आमच्या बाबतींत लवकर उठण्याचा प्रश्नच उद्भवत नाही.

बाबा – म्हणजे ?

बोकील – म्हणजे आम्ही रात्रीं झोपतच नाहीं. इतरांची रात्र म्हणजे आमचा दिवस.

बाबा – हो. खरंच ! म्हणजे तुम्ही सर्कशींत होतांत नाही का ? मग काल रात्रीं होतांत तरी कुठं तुम्ही ?

बोकील -- कठं ? काल सकाळीं माझ्या हृदयाच्या हाकेला इथं ओ मिळाल्यापासून, माझं हृदय या साडेतीन हात देहांत मावेना. चार भिंतींच्या आंत कोंडून राहण्याची कल्पना मला असह्य

झाली. अपेक्षापूर्तीच्या आनंदांत देहांतला कण न् कण हलका होऊन, वाऱ्यावर तरंगत तरंगत गगनाला गवसणी घालतो आहे, असं मला वाटायला लागलं. खोलीला कुलूप लावून मी बाहेर पडलों.

बाबा – अहो भुकेनं कळकळल्यामुळं झालं असेल तसं. चांगलं पोटभर जेऊन घेतलं असतंत म्हणजे बरं वाटलं असतं.

बोकील – होय ! पण अन्नानं शमणारी ती भूक नव्हती. प्रेमाचीं पंचपक्वान्नं तिला पाहिजे होतीं. तेव्हापासून जिथं जिथं त्यांचा साक्षात्कार होण्याचा संभव होता, तिथं तिथं मी त्यांचा पाठलाग करीत फिरलों.

शालन – म्हणजे कुठं ?

बोकील – रस्त्यारस्त्यानं, नदीच्या कांठाकांठानं, डोंगराडोंगरावरून, वानवडीपासून वेताळटेकडीपर्यंत आणि पर्वतीपासून चतुःशृंगीपर्यंत सारं पुणं मीं पायाखालीं घातलं; आणि शेवटीं रात्रीं श्रांत शरीरानं आणि शांत मनानं मी म्युनिसिपॅलिटीच्या बागेंत येऊन पोहोचलों.

बाबा – आणि तिथंच झोपलांत वाटतं ?

बोकील – पहारेकऱ्याला आणि पोलीसाला ती झोप वाटली, पण ती झोप नव्हती. प्रेमसमाधि होती ती !

बाबा – पण त्यांना हें पटवून द्यायला तुम्हांला बरंच कठीण गेलं असेल नाही ?

बोकील – होय; पण सर्कशींतल्या सफाइदारपणानं मला सावरलं. त्यांची पाठ फिरतांच मी फिरून समाधिस्थ झालों. त्या समाधीच्या अवस्थेंत माझी ही प्रेममूर्ति माझ्या दिव्य दृष्टीपुढे विहार करायला लागली; आणि पहाटे समाधि उतरून

मी डोळे उघडून पाहातों, तों ती साक्षात् माझ्यापुढे उभी !

बाबा – अस्सं ! पण आता ती समाधि पुरती उतरली आहे ना ? नाही तर आम्ही तुम्हांला औषध देतों ती उतरण्याचं. ( शिंका ).

शिरीन – ( दचकून उठत ) अगबाई, हें काय ? विठू, ए विठू, ( येतो. ) काय रे ? साहेबांना काय झालं ?

बाबा – अग, त्याला कशाला विचारतेस ? तुला ठाऊक नाही काय झालं असेल तें ?

शालन – सर्दी म्हणे ! जरा कुठं उघड्यावर झोपलं की झाली सर्दी. सारी रात्र हे म्युनिसिपॅलिटीच्या बागेत होते; यांना नाही कुठं कांही झालं तें ? रिकामे चोजले नुसते.

शिरीन – काय रे, तुम्ही माणसं आहांत कीं जनावरं ? आणि म्हणे मी साहेबांचा नोकर. चहा तरी दिलास का नेऊन ?

बाबा – अग, त्याच्यावर कां रागावतेस ? त्यानं नेला होता चहा, पण तो तूं केलेला नव्हतास म्हणून त्यांनी ती कपबशी त्याच्या अंगावर भिरकावून दिली; त्याला तो काय करणार ?

शिरीन – अग आई ग ! अजून चहासुद्धा झाला नाही ना त्यांचा !

बाबा – अग पण त्यांची तुला एवढी काळजी कशाला ? इथं आधी आपण चहा घेऊं न् मग—( शिरीन जाते. ) पाह्यलंत ? हें अस्सं आहे. हिच्या हातचा चहा नसला तर तो त्यांच्या घशाखाली उतरत नाही आणि त्यांनी चहा घेतला नाही, तर स्वतः आपल्या हातानं त्यांना चहा करून दिल्याशिवाय हिला चैन पडत नाही; आणि घटस्फोट घ्यायला निघालीं आहेत !

शालन – मग म्हणणं काय आहे तुमचं ?

बाबा – नाही, माझं कांहीच म्हणणं नाही. हें सगळं दिसत असतांना त्यावर तुम्हां दोघांना काय म्हणायचंय, हें मात्र मला ऐकायचंय.

शालन – मला कांहीहि म्हणायचं नाही.

वोकील – काल जें कांही ठरलं, त्याचा फेरविचार करावा असा परिस्थितींत कांही बदल झालाय असं मला नाही वाटत.

शाळिग्राम – (प्रवेश करून) वाटत काय नाही ? किती तरी बदल झालाय. आतांच एक नवीन कोरं करकरीत स्थळ पाहून आलोंय मी.

बाबा – या या शाळिग्राम. बसा.

शाळिग्राम – छे छे ! बसाबिसायला वेळ नाही. नाही तर बसल्या बसल्या तें नवीन स्थळ हातचं जायचं. आणि शालन, तूं इथं काय करीत बसली आहेस ? तुला पाह्यला म्हणून घरीं गेलों, तर तुझा पत्ता आहे कुठं ? चल ऊठ बघूं !

शालन – उठत नाहीं. जेव्हा तेव्हा मला ' तूं असंच कर न् तसंच कर ' सांगायला तुम्ही काय मला कुक्कुलं बाळ समजलांत कीं काय ?

शाळिग्राम – छे छे ! तसं समजलों असतों तर तुझ्यासाठी नवरा शोधायला कशाला पायपीट केली असती ? पाळणा पाहात हिंडलों असतों. ऊठ आधी.

शालन – नाही उठत. इथला कांहीतरी निकाल लागल्याशिवाय इथून मी एक पाऊलभरहि हालणार नाहीं.

शाळिग्राम – बरं, मर्जी तुझी. तूं येत नाहीस तर मीच बसतों इथं. (शरद शिंकतो.) ऑं—?

शालन – सारखं हें अस्सं चाललंय. शिंकावर शिंका आणि मधून मधून — शीं: ! दोन मिनिटं निर्वेधपणं बोलतांसुद्धा येत नाही.

शरद – आपण केव्हा आलांत ?

बोकील – Hallo ! Good morning Mr. Sharadkumar ( हस्तांदोलन करण्यासाठीं हात पुढे करतो, शरद स्तब्ध राहातो.) Come on. Be a sport.

बाबा – काय शरदकुमार ? तब्येत ठीक दिसत नाही. सर्दी झाली आहे वाटतं ? (शरदकुमार शिंकतो.)

शाळिग्राम – सर्दी झालीय का ? वा– वा: ! त्यावर आमची कृष्णंभट्टी म्हणजे अगदी रामबाण उपाय. हं, पाहा तर खरी. (तो येत नाही.)

शालन – सर्दी झाली म्हणजे माणूस सारे शिष्टाचारसुद्धा विसरत असेल याची नव्हती मला कल्पना.

बाबा – खरच शरदकुमार, आपल्याकडे ही मंडळी पाहुणी आली आहे. त्यांचं आगतस्वागत करणं— त्यांची विचारपूस करणं, हें आपलं काम आहे.

शरद – हं.

बाबा – पाहुण्यांचा असा अपमान करणं बरं नव्हे.

बोकील – कांही हरकत नाही. मीं क्षमा केलीय त्यांना. शिरीनला तिच्या सुखाचा मार्ग सहज सुकर करणाऱ्या या साधुपुरुषाला, शिष्टाचाराच्या उल्लंघनाचे शेकडो अपराध या फरहादकडून माफ आहेत. खरोखर, धन्य आहे तुमच्या धैर्याची.

शालन – What a sport !

बाबा – बरं झालं. थोडक्यांत संपलं. शरद्कुमार, या जरा बसा असे. या मंडळींशीं बोला कांही.

शरद — मला कुणाशीं कांहीच बोलायचं नाही. मला जें कांही सांगायचं होतं तें मीं कालच सांगून टाकलंय. (शिरीन चहा घेऊन येते.)

बोकील — Allow me please. (ट्रे घेऊन टेबलावर ठेवतो.)

शाळिग्राम — (शालनला एकीकडे) हें हळू हळू काय आहे ? हे इंग्रजी शिष्टाचार तूं कसे कांही शिकली नाहीस ?

शालन — मला नाहीं आवडत हे विलायती थेर.

शाळिग्राम — हं. म्हणूनच तुझं कुठं जमत नाही असं दिसतंय. (शिरीन शालनच्या हातून शरदकुमारांना चहा देते.)

बाबा — (चहा पितां पितां) हं ! शरद्कुमार, कसा काय आहे चहा ?

शिरीन — हं. यांच्या हातांतून कप दिल्यामुळं काय चहाला चव आली असेल तों खरी.

शालन — छे छे ! आपल्या हातच्या मिठ्ठासपणाची मिठी अजून कांही सुटलेली नाही त्यांच्या जिभेची. (शरदला) कां हो, सकाळीं यांच्या हातचा चहा नव्हता, म्हणून तुम्ही फेकून दिला म्हणे ! (शिंका)

शिरीन — विठू, ए विठू, एक आरामखुर्ची आण बरं पलीकडच्या खोलींतून !

बोकील — बाबासाहेब, हें विषयांतर बस्स झालं. आता आपल्याला मुख्य मुद्यावर यायला पाहिजे. नाही तर तो तसाच पडून राह्यचा.

बाबा — मग काय म्हणतां तुम्ही ?

बोकील — म्हणायचं काय ? घटस्फोट घ्यायचा हें ठरलंच आहे. आता प्रश्न एवढाच की तो या दोघांपैकी मागायचा कुणीं ? (विठू खुर्ची आणतो.)

शिरीन – (विठूला) ठेव तिथं. आणि काय रे, तुला डोळे नाहीत का?

विठू – हायत की.

शिरीन – मग त्यांनी दिसत नाही वाटतं?

विठू – आँ? दिसतंय ना.

शिरीन – मग तुझ्या साहेबांना इतकी सर्दी झालीय आणि ते खिडकीसमोर वाऱ्यावर बसले आहेत; दिसत नाही तुला?

विठू – आ– पर– दिसतंय की.

शिरीन – मग सांग त्यांना तिथून उठून इथं आरामखुर्चीवर बसायला.

विठू – धनी— बाइसाब!

शरद – मला काय होतंय एवढ्याशा वाऱ्यानं?

शाळिग्राम – छे छे! ही सर्दी दिसायला क्षुल्लक वाटते, पण महाभयंकर परिणाम आहेत बरं तिचे! जरा हयगय झाली तर फट् म्हणतां क्षयावर जायचं दुखणं!

शिरीन – विठू, काय सांगितलं तुला मीं?

विठू – साहेब—

शरद – विठू, तुझ्या बाईसाहेबांना म्हणावं, साऱ्या रात्रभर तळमळत होतांत, जरा शांतपणें पडा आणि रखमाकडून कपाळाला अमृतांजन चोळून घ्या!

शालन – तुम्हांला कशाला हो नसत्या चौकशा? कपाळ दुखलं तर काय करावं हें न कळण्याइतक्या लहान का आहेत त्या?

विठु – बाईसाब,— रखमा, त्या कपाटांतून डोक्याला चोळायचं मलम घेऊनशानी ये.

बोकील – एकंदरींत घटस्फोटाच्या कायद्याचा विचार केला तर पतीपेक्षा पत्नीनं घटस्फोट मागणं हेंच अधिक सोयिस्कर.

शिरीन – विठू, तुझ्या साहेबांना म्हणावं, ते जर प्रथम मुकाट्यानं इथं येऊन बसणार असले तरच मी हें अमृतांजन लावीन कपाळाला. बसव त्यांना इकडे आणून.

बाबा – शरद्‌कुमार, कशाला उगीच थोडक्याकरता? (विठू व शाळिग्राम शरदला उचलतात.)

शरद – अरे, हें काय ? मला काय झालंय ? तुम्ही हें चालवलं आहे काय ? मला काय चालतां येत नाही ? (बसतो.) रखमा, हा मी बसलों इथं. झालं तुझ्या मनासारखं ? रखमा, तुला इतकी अक्कल नव्हती का ग ?

विठू – आँ ? काय विचारल्यात साहेब ?

शरद – मालकिणीची प्रकृति इतकी बरी नसतांना त्यांना कसा तूं चहा करूं दिलास ?

विठू – काय ग ? तूं क्येला असतास तर काय हात मोडले असते व्हय ?

शालन – पण पत्नीनं घटस्फोट कां मागायचा ? यांनी कां मागूं नये ?

शिरीन – विठू, साहेबांच्या अंगावर कपडे कुठले आहेत ?

रखमा – काय व्ह ? बोला की. आता कां दांतखिळी बसली ?

विठू – रोजचेच्च कपडे हायती बाईसाब.

शिरीन – अरे गद्ध्या, पण साहेबांना रोज सर्दी झालेली असते का ? अशा वेळीं गरम कपडे घालायचे असतात.

शाळिग्राम – हां. नाही तर अंगाला वारं लागून तापबीप यायचा न् भलतंच कांहीतरी व्हायचं.

शिरीन –होय ना. जा. कपाटांतून तो मीं विणलेला स्वेटर--स्कार्फ– गरम पायमोजे घेऊन ये.

शरद – रखमा, तुझ्या मालकिणीला म्हणावं, की स्वस्थ पडून विश्रांति घेण्याऐवजी जर ती असाच सारखा जिवाचा आटापिटा करणार असेल तर मी उठून जाईन इथून.

रखमा – बाईसाब.

शिरीन – बरं बसतें.

बाबा – शरद्कुमार-शिरीन, अहो, तुमच्या प्रकरणासंबंधीचं बोलणं चाललेय इकडे; आणि तुमचं लक्षच नाही. मग काय हें थांबवायचं का ?

शरद – नाही नाही. या प्रकरणाचा जितक्या लवकर सोक्षमोक्ष होईल तितकं मला लवकर बरं वाटेल.

शालन – कां हो, तुमचा बेत बदलला नाही ना अजून ?

शिरीन – मुळींच नाही. माझं चांगलं लक्ष आहे तुमच्या बोलण्या-कडे. चालूं द्या तुमचं.

वोकील – मी असं सांगत होतों, की पत्नीनं घटस्फोट मागणं हें अधिक सोयिस्कर; तर त्या म्हणतात की पतीनं घटस्फोट मागायला काय हरकत आहे! (विठू कपडे घेऊन येतो.)

शिरीन – आणलेस कपडे? दे त्यांना घालायला.

वोकील – त्याचं कारण असं, की शरद्कुमारांना घटस्फोट मिळवा-यचा असेल तर त्यांना शिरीनबाईकडून व्यभिचार घडला हें सिद्ध करावं लागेल.

शिरीन – काय म्हणालांत ?

वोकील – नाही-नाही. मी कायदा काय आहे तो सांगतोय; आणि त्याला जर शिरीनबाईंची तयारी असेल, तर Co-respon-dent म्हणून माझं स्वतःचं नांव द्यायला माझी कांहीच हर-कत नाही.

शरद — (रागांत उठून) पण माझी हरकत आहे त्याला. माझ्या बायकोचं नांव तुझ्यासारख्या विदूषकाबरोबर—

शिरीन — हें काय असं? विठू, त्यांना खाली बसव. जिवाला असा त्रागा करून घेतल्यानं दुखणं वाढायचं आणखी. बोलूं नका. बसा बरं खाली!

शालन — मग त्यांची हरकत असली तरी तुमची नाहीना कांही हरकत याला?

शिरीन — विठू, तो रग नीट घाल बरं त्यांच्या पायावर.

शरद — (रग फेकून देतो.) Damn it, चल हो बाजूला. तिला काय समजतंय यांत? तिची हरकत नसली तरी मी हें होऊं देणार नाही. लग्नाच्या बेडींतून तिला मी मोकळा करायला तयार झालों, तो केवळ तिच्या सुखासाठीं. तिच्यावर असले घाणेरडे आरोप करून आपली बाजू बळकट करण्यासाठी नव्हे. हिच्यासारख्या साध्वी स्त्रीच्या शीलावर शिंतोडे उडवणारी जीभ मी मुळासकट उखडल्याशिवाय राहणार नाही.

बाबा — हां! हां!

बोकील — Hear, Hear! हेंच हेंच मी म्हणत होतों. तुमचं आमचं अगदी एकमत आहे या बाबतींत.

शालन — मग म्हणणं तरी काय आहे तुमचं?

बोकील — मी अगोदरच सांगितलं आहे, की शिरीनबाईंनी घटस्फोट मागावा म्हणून.

शिरीन — मी मुळींच मागणार नाही; आणि यांना इतकी सर्दी झाली असतांना तर नाहीच नाही.

शालन — हं ऽ ऽ? अशी आयत्या वेळीं माघार घ्यायची होती तर काल कशाला इतका आव आणला होतात?

शिरीन — कोण घेतंय माघार ? हे सुखी होणार असतील तर त्यांच्या मार्गातून दूर व्हायला मी अजूनहि तयार आहें.

शालन — होय ना ? मग शब्दच्छल कशाला ? शरद्‌कुमारांना तुमच्या पावित्र्यविडंबनाबद्दल भीति वाटते आहे, ती सोडून द्यायला मन वळवा त्यांचं !

शाळिग्राम — काय हो बाबासाहेब, हें काय मांडलं आहे काय सारं ? घटस्फोट काय— व्यभिचार काय— ते कोरे पांढरे काय— अहो आहे काय हें ?

बाबा — अहो, हा सारा नवमतवाद आहे. तुम्हाआम्हाला नाहीं कळायचं हें. हं, मग काय शरद्‌कुमार ? आहे का तयारी ?

शरद — नाही. शक्य नाही. मी हिच्यावर असला घाणेरडा आरोप कालत्रयींहि करणं शक्य नाही.

बाबा — म्हणजे याचा अर्थ एवढाच, की हिला आवडत नसलं, तरी हा घटस्फोट व्हायचा असेल तर तांत्रिक दृष्ट्या तरी हिनंच तो मागणं भाग आहे. बरं, घटकाभर आपण धरून चालूं या तसं. बरंऽ, तिनं घटस्फोट मागितला—तर त्यासाठीं काय काय सिद्ध करावं लागेल ?

बोकील — फक्त दोन गोष्टी. एक म्हणजे शरद्‌कुमार हे दुसऱ्या कुणातरी एखाद्या स्त्रीबरोबर पतिपत्नीप्रमाणं राहात होते ही; आणि दुसरी म्हणजे, शिरीनबाईंना त्यांनी वाईट रीतीनं वागवलं— मारहाण केली ही.

बाबा — हं. मग काय शिरीन ? तुला कबूल आहे ना हें ?

शिरीन — इश्श ! मला त्यांच्याबद्दल असला भलता संशय कधीच आला नव्हता; आणि आमचीं कितीहि भांडणं झालीं,

कितीहि मतभेद असले– तरी मारणं तर दूरच, पण एकहि वेडावांकडा शब्द मला ते कधी बोलले नाहीत.

बाबा – मग काय हो बोकील, कसं जमायचं हें ?

बोकिल – त्यांत काय आहे ? पूर्वीचा पुरावा नसला तर नवीन तयार करायला पाहिजे. यासाठी दुसऱ्या कुणातरी स्त्रीची जरूर पडायची, तर तिची जागा या शालनबाई भरून काढतील.

शाळिग्राम – म्हणजे काय करायचं हिनं ?

बोकील – यांनी आणि शरद्कुमारांनी कुठल्यातरी हॉटेलांत एकादी रात्र एकत्र काढायची.

शालन – शरम नाही वाटत तुम्हाला असली भलतीसलती सूचना करायला ? मला लग्न करायचं आहे. अशी बदनामी करून घ्यायची नाही.

बोकील – ( दिलगिरीच्या स्वरांत ) उगाच गैरसमज करून घेतलात आपण. माझं स्त्रीदाक्षिण्य मला आपल्याला भलतं–सलतं कसं सुचवूं देईल ? यांना घटस्फोट मिळाला तर त्यांचा न् आपला विवाह होणारच आहे; तेव्हा—

शालन – तेव्हा नाही नी आता नाही; केव्हाहि झालं तरी मी अशाच निर्लेप परिस्थितींत लग्न करीन, की तिच्याबद्दल कुणाला कांहीच आक्षेप घेतां येणार नाही. डागळलेल्या चारित्र्याचा शिक्का मी माझ्या जीवनावर कधीच बसूं देणार नाही.

शाळिग्राम – हां– तरी म्हटलं माझी मुलगी आहे.

बाबा – खरं आहे. पण मला वाटलं होतं की आपण तेवढ्या स्वार्थ-त्यागाला तयार व्हाल.

शालन – हा उपदेश मघाशीं आपण आपल्या मुलीला केला असतात तर ?

शरद – त्यांच्या भावनेबद्दल मला पूर्ण आदर आहे. मी त्यांना मुळीच आग्रह करणार नाही तसा. तांत्रिक अडचण दूर करण्याकरितां कुणीहि एकादी भाडोत्री स्त्री मिळू शकेल.

शिरीन – इतक्या हीन अभिरुचीच्या प्रदर्शनाला तुम्ही तयार आहांत?

शरद – दुसरा इलाजच नाही त्याला.

बोकील – ह! आतां दुसरं म्हणजे– यांना वाईट रीतीनं वागवून मारहाण करणं.

शालन – यांनी 'वधू पाहिजे' म्हणून नोटीस दिली, यापेक्षा वाईट रीतीनं वागविण्याचा वेगळा पुरावा काय पाहिजे?

बोकील – तो आहे; पण तेवढा पुरेसा नाही. प्रत्यक्ष मारहाण केली पाहिजे.

शरद – ठीक आहे. जें जें कांही करायचं असेल तें तें सांगा; आम्ही त्याप्रमाणें करतों. माझी भूमिका मी बिनतक्रार वठवतों.

बोकील – Splendid! तुम्हीं आता तावातावानं त्यांच्याजवळ जायचं, त्यांच्यावर खूप तोंडसुख घ्यायचं, त्या तुम्हाला उलट उत्तर देतील, मग तुम्ही त्यांना मारायला हात उगारायचा, त्यांनी फिरून तुम्हांला उलटून बोलायचं, मग तुम्ही त्यांना थप्पड मारायची; अन् शेवटीं त्यांनी तिरीमिरी येऊन कोलमडून खाली पडायचं! बस्स–झालं.

शरद – पण भांडण कशाबद्दल आणि बोलायचं काय तें नाही सांगितलंत.

बाबा – वा:! हें सुद्धा तुम्हाला दुसऱ्यांनी शिकवायचं?

बोकील – अहो उठा. प्रसंग हिम्मत देतोच आहे मर्दाला—

शरद – ठीक आहे (शिंक येते–बोकील रुमालावर युकॅलिप्टस् टाकून तो रुमाल शरदच्या नाकाजवळ धरतो.) डार्लिंग, नाही नाही, शिरीन!

दांत काय काढतेस? पुन्हा हसशील तर दांत घशांत घालीन. फार वाईट खोड आहे तुला ही. परवा मी सामान लावतांना. अडखळून पडलों, तर केवढ्या मोठ्यांदा हसलीस तूं. अडखळून पडल्याचं मला कांहीच वाटलं नाही; पण तुझ्या हसण्यानं मात्र माझ्या अंत:करणाला घरं पाडलीं. पुरुष जातीचा अपमान एका स्त्रीकडून मला सहन होणं शक्य नाही. (शिरीन हंसते.) हंसतेस काय? (हंसते) पुन्हा हंसतेस. मला उलट उत्तर दे–तुझं हसणं ह्यालाच मी उलट उत्तर समजतों! हा पाहा तुला मारायला हात उगारला! [हंसते.] कसं जमायचं हें? मी इतका सुंदर अभिनय करतों आहें, पण ही त्याला रिस्पॉन्सच देत नाही; मग मी एकटा काय करणार?

शाळिग्राम – हा:! आम्हाला कधी अशी अडचण पडली नाही. आम्ही आपल्या बायकांना असे बदडायचे, असे बदडायचे की ज्याचं नांव तें! आणि तुम्हां आजकालच्या नवऱ्यांना बायकोला एक थप्पड मारवत नाही--ह्यॅ—!

बोकील – शिरीनबाई, तुमचं हें हसणं स्वाभाविक आहे; पण एकंदर प्रसंगाचं गांभीर्य लक्षांत घेऊन, ह्या घटनेचं पर्यवसान ट्रॅजिक होईल अशारीतीने तुम्हांला आपला अभिनय आणि मूड सीरियसच ठेवला पाहिजे.

शिरीन – बरं, पाहातें प्रयत्न करून.

बोकील – शरद्‌कुमार, Proceed! करा सुरवात—

शरद – ठीक आहे. आता दुसरी गोष्ट म्हणजे माझ्याबद्दल तुला कांही सहानुभूति वाटत नाही. आपल्या वडिलांना जेवायला

थोडा उशीर होईल, म्हणून सकाळीं उजाडलं नाही तोंच तूं मला आंघोळ करायला लावतेस. माझ्यापेक्षा तुला आपले वडील जास्त जवळचे वाटतात.

शिरीन – मग, वाटणारच! त्यांनी मला लहानाची मोठी केली, माझ्यासाठी खस्ता खाल्ल्या, तुम्ही काय केलंय?

शरद – लग्न केलंय तुझ्याशीं.

बाबा – होय; आणि तो मूर्खपणा निस्तरण्यासाठी तर हा सारा खटाटोप चालला आहे ना तुम्हा दोघांचा?

शरद – खरं आहे. मीं केलेलं कांहीएक तुला पसंत पडत नाही. मीं घर बदललं त्याला तूं नावं ठेवलीस; मला शिव्या दिल्यास; उडाणटप्पू म्हणालीस; बोल. दे उलट उत्तर! (हंसते.)

शालन – हा काय सीरियस मूड आहे की नुसता खेळखंडोबा? कसली ह्यांतून गंभीर घटना निर्माण होणार? ट्रॅजेडी कसली, फार्स चालला आहे नुसता!

बोकील – (विनवणीच्या स्वरांत) शिरीनबाई, तुम्ही या बाबतींत त्यांच्याशीं जरा जास्त सहकार्य करायला पाहिजे!

बाबा – अहो बोकील, संसारांत जें साधलं नाही, तें तिला ह्या नाटकांत एकदम कसं साधणार? तुम्हीच दाखवा बरं करून एकदा!

बोकील – ठीक आहे. मी एकदा करून दाखवतों; आणि मग ताबडतोब तुम्ही त्याप्रमाणें करायचं. हो! पण ह्याला कुणीतरी साक्षीदार पाहिज़े.

शालन – मग आपण आहोंतच की!

बोकील – आपले हितसंबंध गुंतले आहेत त्यांत. कुणीतरी स्वतंत्र साक्षीदार पाहिजे.

बाबा – मग विठू, रखमाला बोलवा.

बोकील – हां, तीं चालतील.

शरद – ठीक आहे. विठू— (विठू येतो)

शिरीन – रखमा— (रखमा येते)

बोकील – (विठू- रखमास) असे इथे उभे रहा; आणि जें जें कांहीं इथं होईल, तें नीट लक्षपूर्वक पहा. शरदकुमार करा सुरुवात.

शरद – (तावातानें) मिस्टर बोकील—

बोकील – नाहीं– नाहीं. मी शिरीनबाई आहें, असं समजून बोलायचं !

शरद – मग तसे बसा की ! (बोकील तसा बसतो) शिरीन, मीं हें सर्व संहन केलं असतं, पण माकडांना आणि कुत्र्यांना शिकवणाऱ्या या भंपकरावाकडून आम्हा शाहाण्यासुरत्या माणसांना तूं कायदा शिकण्याची पाळी आणलीस—

बोकील – शरदकुमार !

शरद – त्याच्या आचरट भापणाच्या कडू काढ्याचे डोस आम्हाला तूं भरभरून पाजलेस–

बोकील – शरदकुमार, तोंड सांभाळा.

शरद – या विदूषकाच्या माकडचेष्टांना तूं भर दिलीस ! ह्याबद्दल मात्र मी तुला कधींच गय करणार नाहीं. (मारतो)

शाळिग्राम – वाः वाः ! छान् ! !

बोकील – हें असं व्हायला पाहिजे. (गाल चोळीत दिग्दर्शकाच्या आविर्भावानें) शिरीनबाई, बसा तुम्ही. हां, शरदकुमार, मूड सोडूं नका. मूड सोडूं नका.

शरद – नाहीं सोडीत ! आतां रंगदेवता माझ्या अंगात संचारली आहे. आतां मला अभिनयाची कांहीच आवश्यकता नाहीं. शिरीन,

आपल्या प्रेमाच्या भांडणाचा इतका विलक्षण विपर्यास होईल अशी मला कल्पना नव्हती. कितीतरी वेळां मुद्दामच उलटी बाजू घेऊन मी तुझ्याशीं भांडलों असेन; उसन्या रागाच्या आविर्भावानें तुला टाकून बोललों असेन; पण हें करतांना तुझा अपमान करावा, तुला तुच्छ लेखावं असा असा माझा कधीच उद्देश नव्हता. उत्कट प्रेमानं प्रेरित होऊन केवळ आपल्या संसाराला रंग भरावा,-- आपल्या प्रेमाचा गोडवा वाढावा, म्हणून मी हें करीत असें; पण त्यापासून तुला यातना होतील,– तुझं-माझं अंतःकरण, एक-मेकांपासून दुरावेल,– आपल्या प्रेमाचा प्रवाह आटून जाईल, याची मला कधीच कल्पना आली नाही. कुणाचीहि दृष्ट लागावी असा आपला हा संसार आहे, असं मी समजत होतों; पण काल माझे डोळे उघडले, माझी चूक मला कळून आली; तुझ्या मनाचा मी कोंडमारा करीत होतों,– आशा-आकांक्षांची अडवणूक करीत होतों,– याची मला जाणीव झाली.

शिरीन – नाही – नाही. शरद्कुमार, असं बोलूं नका.

शरद – तुला सुखी करणं, हा एकच हेतु मी माझ्या हृदयांत नेहमी बाळगीत होतों; आणि म्हणूनच ती भयंकर जाणीव झाल्या-वर, आजपर्यंतच्या आपल्या अपराधाचें प्रायश्चित्त घेण्या-साठी– तुझ्या सुखाचा मार्ग मोकळा करण्यासाठी– मी तुला माझ्यापासून मुक्त करायला तयार झालों. माझं तुझ्यावर आत्यंतिक प्रेम होतं– आहे– आणि राहील ! तुला सुखी करावं, आपण सुखी व्हावं, म्हणून वडील माणसांच्या विरोधाची पर्वा न करतां मी तुझ्याशीं विवाहबद्ध झालों;

पण माझ्या विचित्र वागणुकीमुळं मला आपलं दोघांचंहि सुख साध्य करतां आलं नाही; आणि तेवढयाचसाठी, प्रेमानं तुझ्या गळ्यांत तेव्हा जो मीं हात घातला, त्याच हातानं आज आता—( शिरीनला मूर्च्छा येते. )

बोकील – अरे अरे, यांना मूर्च्छा आली वाटतं ? विठू—रखमा—पळा. कुणी तरी पाणी आणा—

शरद – थांबा. खबरदार कुणी एक पाऊल पुढं टाकाल तर. आमचीं भांडण आम्ही सोडवूं. आमचे मतभेद आम्ही मिटवूं. माझ्या बायकोची काळजी घ्यायला मी समर्थ आहें. शिरीन, डार्लिंग—

शिरीन – शरद्कुमार.

शरद – शिरीन, माझी एकट्याचीच. (तिला उचलून आंत घेऊन जातो.)

बोकील – ( कौतुकाने त्यांच्याकडे पाहत ) वा– वा ! सच्ची मोहब्बत झिंदाबाद !

बाबा – कां हो बोकील, या पर्यवसानाने तुमचा विरस होण्याऐवजी तुम्हांला आनंदच झालेला दिसतोय !

बोकील – अर्थात्, होणारच ! खऱ्या प्रेमाचा हा असा विजय पाहून कुठल्या जातिवंत प्रेमाच्या पाइकाला आनंद होणार नाही ?

शरद – शिरीनचा विजय असो.

शाळिग्राम – हंः ! झालं– लागला निकाल ह्या स्थळाचा ! चल, आता वेळ मोडूं नकोस, नाही तर तें आता ठरवून आलेलं स्थळहि हातचं जायचं ! चल, ऊठ !

शालन – (निश्चयाने कठोर स्वरांत) उठत नाही; आणि तुम्ही कुठं चाललांत ? बसा तिथं. तुम्हां आम्हां सर्वांना हास्यास्पद बनवण्याचा या नवराबायकोनं कट केला आहे; आणि आता

इथं साळसूदपणाचं पांघरूण ओढून बसलेला हा म्हातारा त्यांचा साथीदार आहे.

बोकील – छे छे! असा गैरसमज करून घेणं, म्हणजे पवित्र प्रेमाच्या प्रचीतीला पारखं होण्यासारखं आहे.

शालन – हं: ! या प्रेमाच्या प्रहसनाचा तुमच्यासारख्या प्रेमी पागलांवर परिणाम होईल; मला त्याची कांहीच पर्वा नाही. केवळ लोकांची चेष्टा करण्यासाठी या नवराबायकोनं जाहिरात दिली; आमच्या तात्यांसारख्या साध्याभोळ्या माणसाला आशा लावली; बाजारांत विकायला आणलेल्या जनावरासारखं माझं प्रदर्शन करवलं! हा अपमान, ही विटंबना, मी मुकाट्यानं सहन करणं शक्य नाही. यांचा खेळ होतो पण आमचा जीव जातो. या आचरटपणाचा पुरेपूर भुर्दंड यांना भरायला लावलाच पाहिजे.

शाळिग्राम – म्हणजे? आता आणखी काय मला तूं करायला लावणार?

शालन – या सगळ्यांना कोर्टांत खेचलं पाहिजे. आमच्या मनस्तापाची — आमच्या बदनामीची — यांना भरपाई करायला भाग पाडलं पाहिजे; त्याशिवाय नाही वठणीवर यायचे हे!

शाळिग्राम – बरोबर आहे; असंच करायला पाहिजे. चल, आपण आपल्या भुस्कुटे वकिलांचाच सल्ला घेऊं या!

बोकील – अहो, वकील कशाला? मी आहें ना? मी सांगतों तुम्हांला काय पाहिजे तें.

शालन – तुम्ही बसा यांचीं कौतुकं करीत! तुमचा सल्ला नको आहे आम्हांला.

बाबा – अहो, एवढा बॅरिस्टरचा बेटा फुकट सल्ला देतो आहे, तर नुसतं ऐकून घ्यायला काय जातंय तुमचं ?

शाळिग्राम – छे छे ! हें पोरांसोराचं काम नाही. आमचा भुस्कुटेच पाहिजे त्याला. तो एकदा जड्जासमोर बोलायला लागला—

शालन – पुरे झालं तुमचं बोलणं. चला बघूं आधी.

शाळिग्राम – हो हो. चल. काय समजले आहेत हे ?

बाबा – आम्ही कांही समजलों नाही. म्हातारेबुवा, तुम्हीसुद्धा काय भडकून जातां असे पोरांसारखे ? हं ! बोकीलसाहेब, तुम्ही तरी कांही सांगून बघा यांना.

बोकील – होय ! कर्तव्यच आहे माझं तें. शालनबाई, आपली मन:स्थिति मी ओळखूं शकतों; पण उगाच त्रागा करण्यांत काय अर्थ आहे ? माणसाच्या आयुष्यांत मनाचा मोठेपणा दाखवण्याचे जे कांही आणीबाणीचे प्रसंग येतात, त्यांपैकींच हा एक आहे. दुसऱ्याच्या सुखासाठी स्वत:च्या स्वार्थावर पाणी सोडण्याची आलेली ही संधि आपण दवडूं नये. समंजसपणा दाखवावा, सौजन्यानं झालं गेलं विसरून जावं, सहजासहजी साधलेले हे स्नेहसंबंध कायम टिकवावेत, अशी माझी आपल्याला विनंति आहे.

शालन—Hear – Hear ! कां हो, शनवारवाड्यापुढं एखाद्या जाहीर सभेंत भाषण करताहांत असं वाटलं कीं काय आपल्याला ?

बोकील – छे छे ! मी अगदी मनापासून, कळवळून बोलतों आहें.

शाळिग्राम – हो हो ! तें ओळखलं आम्हीं. मघाशी फाडकन् श्रीमुखांत बसली तेव्हा आलेला कळवळा अजून गेलेला दिसत नाही.

बोकील — माझ्या उदात्त उद्देशाचं आपणांउभयतांकडून असं विडंबन होणं उचित नाही. श्रीमुखांत बसली असतांहि मी आपणांस हें सांगतों आहें, यावरून माझा हेतु किती स्वार्थनिरपेक्ष आहे, हें सहज समजण्यासारखं आहे. माझ्या विनंतीचा आपण अव्हेर करूं नये.

शाळिग्राम — का हो, बारसं नू बारावं तुम्हांला दोन्ही सारखींच! काल आल्यापासून त्यांच्याविरुद्ध तुमचा उत्साह नुसता ओसंडत होता; आणि आता कळवळून— अगदी जीव तोडून-- त्यांची तरफदारी करीत आहांत! अहो, काय चालवलंय काय तुम्हीं हें?

शालन — तात्या, त्यांच्या बडबडीकडे तुम्ही मुळींच लक्ष देऊं नका. घरीं चला बरं!

बोकील — ठीक आहे. सामोपचार संपला. सर्व उपाय हरले. आता शेवटचा एकच उपाय. देवा, मला क्षमा कर. मिस्टर शाळिग्राम, शालनबाई, आता एक पाऊल पुढं टाकाल तर माझ्या हातांतल्या या दिव्यदंडाचा मला उपयोग करावा लागेल.

शालन — कां हो रिंगमास्तर! तुम्ही आम्हांला आपल्या सर्कशींतलीं जनावरं समजलांत कीं काय?

बोकील — माणसं माणुसकी विसरलीं म्हणजे तीं जनावरांच्याच पायरीला जाऊन बसतात! बसा आपापल्या जागीं.

शाळिग्राम — म्हणजे काय? मारणार कीं काय आम्हांला तुम्ही?

बोकील — कुणी सांगावं? कदाचित् तेंहि करावं लागेल.

शाळिग्राम — शालन्, चल बैस आपल्या जागीं. काय भयंकर

माणूस आहांत हो तुम्ही ? अहो बाबासाहेब, जरा आपल्या गड्याला तरी हाक मारा हो !

**बोकील** — शाळन्‌बाई, हं—(खुर्चीकडे बोट करतो.)

**शालन** — शाबास ! माझ्या डोळ्याला डोळा भिडवून माझ्यावर हुकमत गाजवायचा प्रयत्न करणारे आपण पहिलेच पुरुष मला भेटलांत ! पुरुषांच्या पराक्रमाची कदर आम्हीं स्त्रियांनीच करायची असते; आणि तेवढ्याचसाठीं, आपल्या हातांतल्या या दिव्यदंडामुळं भिऊन नव्हे ....(खुर्चीवर बसते.)

**बोकील** — Thank you very much madam.

**बाबा** — हं. अखेरीस जातीनं जात ओळखली.

**शाळिग्राम** — त्रस्तसमंधा, झालं तुझं समाधान ? आता आम्हीं आणखी काय करावं अशी तुझी आज्ञा आहे ?

**बोकील** — छे छे ! आज्ञा करण्याचा मला अधिकार नाही. सर्वांनी समजूत दाखवावी आणि सौजन्यानं स्नेहसंबंध वाढवावेत, एवढीच माझी फिरून एकवार विनंति आहे.

**शाळिग्राम** — हो. चांगली समजूत घालतांय आमची. आतापर्यंत जीं जीं स्थळं पाहिलीं तिथं तिथं नकारानं सतावून सोडलं. ह्या स्थळाचा हा असा निकाल लागला. आता तिकडे एक नवीन ठिकाण पाहून हिला न्यायला आलों, तर इथं आम्हांला तुम्ही अगदी स्थानबद्धच करून ठेवलंय; आणि म्हणे स्नेहसंबंध वाढवा ! काय करायचे आहेत काय स्नेहसंबंध ? आणि काय हो, तुम्ही एवढा उपदेश करताहांत, ते तुम्ही तयार आहांत का हिच्याबरोबर बोहल्यावर चढून स्नेहसंबंध वाढवायला ? आँ ? बोला.

**बाबा** — नाही, म्हणजे काय हरकत आहे हो ?

शाळिग्राम – हो; काय हरकत आहे ? बोला.

बोकील – छे, छे ! हें काय भलतंच ? मीं त्या दृष्टीनं कधी विचारच--

शाळिग्राम – घ्या. आता स्वत:शीं येऊन बेतली तेव्हा घाबरलांत; आणि लागलांत विचाराच्या गोष्टी सांगून माघार घ्यायला.

बाबा – छे छे ! अन्याय होतो आहे हा त्यांच्यावर. ते घाबरून माघार घेतील ? शक्य नाही. त्यांचं स्त्रीदाक्षिण्य आड येतंय त्यांच्या. शालनताईंच्या संमतीची वाट पाहाताहेत ते.

शाळिग्राम – एवढंच ना ? ठीक आहे. शालन, तुला पसंत आहे का हें स्थळ ?

शालन – अत्तापर्यंत छप्पन्न ठिकाणीं दाखवायला नेऊन माझी धिंड काढलीत तेव्हां कधी विचारलं नाहीत; आणि आता ह्याच वेळेला माझी पसंती विचारण्याची दुर्बुद्धि तुम्हांला बरी आठवली !

शाळिग्राम – अग, आता यावरून समजायचं काय आम्हीं ? संमति आहे का नाही ?

बाबा – हेंच तें– तुम्हांला कळत नाही तें हेंच !

शाळिग्राम – म्हणजे ? आता हिचे वडील आम्ही का तुम्ही ? आँ ! आम्हांला कळत नाही-- आणि तुम्हांला तरी काय कळलं हो ?

बाबा – अहो, जें कळायचं तेंच ! मी सांगतो, यांची संमति आहे. आतां यांनी सांगितलं त्यापेक्षा अधिक स्पष्ट शब्दांत सांगणं तुम्हांआम्हांलाच काय पण आपल्या बापजाद्यांनाहि जमलं नसतं.

शालन – इश्श ! कांहीतरीच ! !

शाळिग्राम — आं–इश्श ! आणि कांही तरीच ! शालन, तूंच बोलते आहेस का हें ? हं ऽ ! बाबासाहेब, तुम्ही म्हणतां तेंच बरोबर दिसतंय ! आम्हाला कांही कळत नाही हेंच खरं.

बाबा — अहो कसं कळणार ? तुम्ही एकामागून एक नुसतीं स्थळंच पाहाताय— पण आपल्या पोरीकडे पाहिलंय का कधी ? मी आल्यापासून पाहातोंय— यांनी कितीहि आव आणला, तरी ह्या दोघांचा जीव सारखा एकमेकांकडेच ओढ घेतोय. कालच हें माझ्या लक्षांत आलं; आणि तेव्हाच मीं ठरवलं, की हें असं असं व्हायला पाहिजे ! आणि म्हणून तर एवढ्या सकाळीं मीं यांना बोलावणं पाठवलं.

शालन — अस्सं ! मग त्यासाठी एवढं नाटक करून दाखवण्याचे श्रम कशाला घेतलेत ? सरळच कां नाही सांगितलंत ?

बाबा — अहो, मीं सांगितलं असतं तर तुम्हांला तें समजलं असतं हें हें खरं, पण उमजलं नसतं. अहो, कानांनी ऐकलेल्या गोष्टीं-पेक्षा डोळ्यांनी पाहिलेले प्रसंग अधिक परिणामकारक ठर-तात, असा कायसा तुमच्या त्या अलीकडच्या शिक्षण-शास्त्राचा सिद्धान्त आहे ना ? बरं मग काय बोकील, ठरलं ना हें ?

बोकील — यांची संमति असेल तर यांच्या पाणिग्रहणाला मी एका पायावर तयार आहें.

शाळिग्राम — वा वा ! काय बोललांत— काय बोललांत ! कुणाच्या तरी तोंडून हिच्या बाबतींत हे शब्द कानावर पडावेत, म्हणून आज इतकीं वर्षे हे कान आशाळभूतपणं नुसता आ वासून बसले होते, त्यांना तुम्हीं आज धन्य केलंत.

फरहाद्– फरहाद् ! (मिठी मारतो) कुठं ठेवूं तुम्हांला ? अरे विठू, तुझ्या साहेबांना बोलाव; रखमा, तुझ्या मालकिणीला बोलाव आमच्या शालनचं लग्न जमलं. शालन, माझ्या पोटीं आलीस याचं आज सार्थक झालं. बाबासाहेब, तुमच्या-मुळं मला आज हा सोन्याचा दिवस दिसला. बाबासाहेब– (शरद–शिरीन् येतात.)

शरद – कां हो, काय झालं ?

शिरीन – असा हर्षवायु झाल्यासारखं काय करताहेत हे ?

बाबा – अग, यांच्या मुलीचं या आपल्या बोकीलसाहेबांशीं लग्न ठरलं; आणि आपण आज त्यांना यानिमित्त मेजवानी द्यायची, असं ठरवलं आहे मीं.

शिरीन – होय का हो आजोबा ?

शालिनी – हो. हो. अगदी खरं ! हे आमचे जावई होतील असं आता मी इथं येईपर्यंत कुणीं मला सांगितलं असतं तरी मला खरं वाटलं नसतं !

शिरीन – छान् ! शेवटीं आढयाचं पाणी वळचणीला मिळालं म्हणायचं !

बोकील – चल शालन्, आत्ताच्या आत्ता आपण रजिस्ट्रार कचेरींत जाऊन आपल्या लग्नाची नोटीस देऊं.

बाबा – अहो, पण रजिस्ट्रार कचेरींतून जेवायला पुन्हा इथंच या बरं का ! नाही तर हा आनंद तुमच्या अंतःकरणांत न मावल्या-मुळं, बसाल सारा दिवस डोंगराडोंगरानं, रस्त्यारस्त्यानं, नदीच्या कांठाकांठानं भटकत !

बोकील – हः ! हः ! Bye bye मंडळी. (शालन, बोकील जातात.)

शाळिग्राम – हो ! ही आनंदाची बातमी आमच्या तिला केव्हा एकदा जाऊन सांगेन असं झालंय मला. बरं येतों. (जातो.)

बाबा – बरं या. शिरीन, शरद्‌कुमार, आता भांडत बसूं नका. मेजवानीच्या तयारीला लवकर लागा. पण नकोच, मीच आंत जाऊन तयारी करायला सांगतों; नाही तर काल दुपारसारखा आम्हांला थंडा फराळ घालाल फिरून. (जातात.)

शरद – खरंच शिरीन, आपल्या खेळीमेळीच्या भांडणांतून निर्माण झालेलं हें 'पेल्यांतील वादळ' अशा रीतीनं संपेल अशी कल्पनासुद्धा नव्हती मला.

शिरीन – खरंच बाई ! प्रथम तुमच्या सुराला सूर द्यायला मीं सुरवात केली खरी, पण पुढं जसजसं तें वाढायला लागलं, तसतसं मला वाटायला लागलं, कीं आता काय होणार न् काय नाही !

शरद – खरंच शिरीन, कसं बोलवलं तुला तसं ?

शिरीन – आणि तुम्हांला तरी कसा हात उगारवला माझ्यावर ?

शरद – पण अखेरीस धीर कुठं झाला ? एकंदरींत बायकांपेक्षा पुरुषच जास्त प्रेमळ असतात, असं मी नेहमी म्हणतों तेंच खरं.

शिरीन – होय तर ! आलेत ! तुम्हांला जराशी कुठं सर्दी झाली होती, तर माझा जीव सारखा खालीवर होत होता, हें मात्र विसरलांत तुम्हीं.

शरद – नाही ग ! तें कसं विसरेन ? माझ्या सर्दीला तूं एवढे उपचार केलेस, म्हणून तर माझा सारा आविर्भाव सर्द होऊन केला.

शिरीन – माझे शरद, किती प्रेम आहे तुमचं माझ्यावर !

**प्रीत तव अतुला । नाथा ।**
**अनुदिनिं आपुले ।**
**कलह बहरले ।**
**देति तरि सुफला । नाथा ॥ ध्रु० ॥**
**ग्रीष्मताप महा वारे ।**
**सोसुनीया धरणी सारे ।**
**दे धना विपुला ॥ १ ॥**

विठू – साहेब, आम्हांला साद घातली व्हय ?

रखमा – बाईसाब !

शरद – कुणीं बोलावलं तुम्हांला ?

विठू – रखमा म्हंगाली तुम्ही बोलावलंय म्हनून, म्या म्हंगालों म्या नायबा ऐकलं, तर म्हनतां कसं तुझे कान फुटले हैती व्हय ?

रखमा – कां उगीच आळ घेतायसा ? म्यां कवा म्हटलं तसं ? तुमीच मला म्हनलां न्हाइ का, की तुला बाईसाब बोलावत्यात म्हून ?

शरद – विठू, रखमा, तुम्हांला सांगून ठेवतों, आजपासून या घरांत भांडण बंद.

विठू – पर साहेब, आमी कुठं भांडतुया—

शरद – नाहीं, तें मला माहीत आहे. पण– दुसऱ्या कशावरनं भांडलां नाहीत, तरी निदान लग्न केव्हा करायचं याच्यावरून तरी भांडाल ! तें सुद्धा नको आहे. ताबडतोब आत्ताच्या आत्ता लग्न झालं पाहिजे, समजलांत ?

रखमा – पर, बाईसाब—

**शिरीन – समजलं. लेकरांबाळांची काळजी तुमच्याप्रमाणं आम्हांलाहि आहेच की. म्हणून आम्हीं लग्न केलं नाही वाटतं ? तें कांहीं**

चालायचं नाही. काय, आहे कीं नाही कबूल? नाही तर आत्ताच्या आत्ता तुम्हां दोघांना कामावरून काढल्याची नोटीस मिळेल.

विठू – मंग काय ग?

रखमा – काय काय? चला! (दोघें जातात.)

शरद – अरे वा! जमलं की यांचं. एकंदरींत लग्न मोडणं हें दगदगीचं काम असलं, तरी तें जुळवणं सोपं आहे म्हणायचं! बरं शिरीन्, आतातरी हा आपला फोटो इथं लावायचा कीं नाही?

शिरीन् – इश्श! मला नाही माहीत.

शरद – माहीत नाही? बरं राह्यलं. तुझी इच्छा नसेल तर नाही लावींत.

शिरीन – असं कधी म्हटलं मीं?

शरद – होय का? चल तर, आपण दोघांनी बरोबरच हा फोटो इथं टांगू म्हणजे झालं. (दोघें मिळून फोटो लावतात. फोटोकडे पाहात पाहात मागे येत असतां–)

शिरीन् – "जिवा जिवाची अभंग जडली जोड असे ही जरीं"—

शरद – "भीति मग कोणाची अंतरीं." [तिच्याजवळ जातो.]

बाबा – (प्रवेशून) अंहंऽऽऽ!

शिरीन् – (लाजून) अगबाई, बाबा—

बाबा – 'भीति मग कोणाची अंतरी' अं?

शरद – नाही, नाही; भीति परि बाबांची अंतरीं!

[पडदा पडतो.]

**अंक तिसरा समाप्त**

मॉडर्न बुक डेपोचें पुढील प्रकाशन

# नाट्यरूप पेशवाई

लेखक— श्री. गं. भा. निरंतर, एम्.ए., बी.टी.

प्रकाशक— मॉडर्न बुक डेपो,
आनंदाश्रमासमोर, पुणें २.